


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

चित्रकार दीनानाथ दलाल ह्यांनी सन १९४७ ते १९७१ दरम्यान प्रसिद्ध केलेल्या दीपावली ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीय स्वरूपात जतन करण्याबाबतचा प्रस्ताव चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे राज्य मराठी विकास संस्थेस प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावानुसार दुर्मिळ मराठी ग्रंथांचे संगणकीकरण ह्या प्रकल्पांतर्गत दीपावली नियतकालिकांचे अंक संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सहमती दर्शविण्यात आली.

चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला ही सामग्री संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका








रसिक महाराष्ट्राचा
साहित्य कला-विलास

# दीपावली



जुलै १९६७ ● वर्ष २३ वे ● मूल्य १। रु.

## श्रे य ना मा व लि–

संगीतकार देशपांडे–दर्दी, अभ्यासू रसिक–**गोपाळकृष्ण भोबे** ● तुझे आहे तुझ्याचपाशी–फक्त नवरोजींसाठी –**पंडित क्षीरसागर** ● अशापित मी–पति असा असावा–**प्रकाशचंद्र करंदीकर** ● **प्राचीन काव्यांतील कौटुंबिक जीवन**––काव्य आणि व्यवहाराचा मिलाफ–**प्रा. वि. म. कुलकर्णी** (आकाशवाणीच्या सौजन्याने) ● **मुक्ति**–शेवटी इच्छा फलद्रुप झाली–**भास्कर उत्तरवार** ● **कीचक**–लोहपुरुषाच्या जीवनातील नाटय–**प्रा. श्री. र. भिडे** ● **मुलुखावेगळा**–शहाजहाँही शरमला–**दिवाकर बापट** ● **जय कुटुंब नियोजन**–विदारक सत्यकथा ● **स्मृतिगान**–संगितज्ञाच्या बहारदार आठवणी–**कै. पं. ज. वि. पेठे** ● **शिव्यायन**–वायांच्या शिव्या काही औरच–**वि. रा. भाटकर** ● **कोलकोत्तेर बृष्टी**–उघडच आहे की–**विजय पेठे** ● गरगर फिरे विमान–**स्क्वा-लीडर बत्रा** ● **शिवाय रंगमंच, पानपुरी, ऐसी अक्षरे : महानगर–दा. गो. देशपांडे, डॉन ब्रॅडमन–सुधीर वैद्य; दीपमाला, व्यंगचित्रे वगैरे, वगैरे आणि**

**बिंगचित्ररुपी अनर्थसंकल्पमाला : राजकीय शरसंधान**

Gram : Dalalart
फे नं. ३५७७६५

दलाल आर्ट स्टुडिओ, ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४


※ संपादक-मुद्रक-प्रकाशक-मालक श्री. **दीनानाथ दलाल,** दलाल आर्ट स्टुडिओ, ४०–४२. केनेडी ब्रीज, मुंबई ४. या प्रतीस किमत १। रु. + रजि. पोस्ट ५५ पैसे. वार्षिक वर्गणी, दिवाळी अंकासह रु. १२॥. अंकांत प्रसिद्ध झालेली मतें ही चालकांचीहि अधिकृत मते असतातच असे नाही.



**Registered with the Registrar of Newspapers For India under No. RN 1612/57**
**DIPAVALI : Dalal Art Studio, 40-42, Kennedy Bridge, Bombay - 4.**





अनुक्रमणिका

## दीपावली


### दलाल आर्ट स्टुडिओ

४२, केनेडी ब्रीज, मुंबई, ४,
टेलिफोन : ३५७७६५ ★ तारेचा पत्ता DALALART


● **वर्गणीदारास सूचना :** दीपावली व सर्व खास अंकांसह दीपावलीची वार्षिक वर्गणी रु. १२–५० .पसे. द्वैवार्षिक वर्गणी रु. २०; त्रवार्षिक वर्गणी रु.२५ व चार वर्षांची वर्गणी रु. ३२. **परदेशीं वार्षिक वर्गणी १६–००**

● **वर्गणी** मनिऑर्डरनें द्यावी. चेक पाठविल्यास तो दलाल आर्ट स्टुडिओच्या नांवें, मुंबई बँकेवरचा असावा. इतर ठिकाणच्या बँकेवरचा असल्यास ७५ पैसे वटणावळ जादा पाठवावी. कोणत्याहि महिन्यापासून वर्गणीदार होता येतें.

● **अंक न पोचल्याच** कळवावयाचें झाल्यास ५ तारखेपर्यंत वाट पाहून मग कळवावें. अंक ऑफिसमध्यें शिल्लक असल्यास जरूर पाठविला जाईल.

● **जाहिरातींचा व्यवहार** हा परस्पर विश्वासाचा असतो. गिऱ्हाईकांच्या इच्छेनुसार जाहिरात छापण्याची कोशिस करण्यांत येते. तरीहि तांत्रिक अडचणीमुळें अगर अन्य कारणामुळें जाहिरातींत कमी–जास्त फरक झाला तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकावर नाहीं.

● **साहित्याच्या स्वीकृतीचा** निर्णय महिन्याभरांत सामान्यतः कळविला जातो. पोस्टेज असलेलें नापसंत साहित्य परत पाठविलें जातें. पुरेसे पोस्टेज नसल्यास तें निकालांत काढलें जाईल.

● **स्वीकृत अगर इतर साहित्य** गहाळ झालें तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकावर नाहीं.


संपादक, मालक, मुद्रक व प्रकाशक श्री. **दीनानाथ दलाल** यांनीं स्टेट्स पीपल प्रेस, जन्मभूमि भवन, घोगा स्ट्रीट, फोर्ट, मुंबई १ येथें छापून, दलाल आर्ट स्टुडिओ, ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४ येथें प्रसिद्ध केलें.


# अर्थसंकल्पांचा 'घेराव'

१९६६–६७ च्या सार्वत्रिक निवडणुकीनंतर स्थापन झालेल्या संमिश्र सरकारांचे इतर गुण–दोष केंद्रस्थानी सत्तेवर असलेल्या काँग्रेस पक्षाने उचलले आहेत वा नाहीत, हे अद्यापि कळावयाचे आहे. पण 'घेराव'चे तंत्र मात्र चतुर रेल्वेमंत्री पुनाचा व चतुरस्र ख्यातीचे अर्थमंत्री श्री. मोरारजी देसाई यानी बरोबर हेरले. आणि दोघानी फेकलेल्या घेरेदार जाळ्यात नेमका सामान्य माणूसच सापडला, हेही त्यांचेच 'कवतिक'.

रेल्वे मंत्र्यानी ठाणबंद केलेला, अर्थ मंत्र्यांनी हात जखडलेला भारतीय माणूस, आतापर्यंत जिभेचे पट्टे तरी फिरवीत होता. पण प्रत्येक राज्याचे अर्थसंकल्प जसजसे बाहेर पडत आहेत, तसतसे त्याचे ते पट्टेही अडखळू लागले आहेत. व बहुधा या आर्थिक वर्षाअखेर आमची बोलतीच बंद होईल, असे दिसते.

असे म्हणतात की ३१ वर्षांत प्रथमच यंदा रेल्वेला खरोखरच नुकसान सोसावे लागले आहे... बरोबरच आहे ते म्हणा... एकीकडे वॅगन–तुटवड्यामुळे गुजरातेतील चारा–वैरण महाराष्ट्रात येऊ शकत नाही, धान्याची राष्ट्रव्यापी वाहतूक पूर्ण होऊ शकत नाही; म्हणून नसलेल्या पोटालाच पट्टा घट्ट आवळून बांधा; असा इशारा दिल्लीपासून तो गल्लीपर्यंतचे धुरीण देतच आहेत. तर दुसरीकडे वॅगन्सचा 'अंदाजित' वापर न झाल्याने लक्षावधी रुपयांचे नुकसान झाले होऽऽ म्हणून पुनाचा आणि मंडळी टाहो फोडीत आहे.

मुंबई–दिल्ली, मुंबई–मद्रास मार्गावर डि–लक्स गाड्या तर मुंबई–सूरत, मुंबई–पुणे मार्गावर नव्या नखऱ्याने नटलेली 'उडती' आणि 'दख्खन' राणी सुरु करून प्रवास सुखकारक केल्याबद्दल रेल्वे आपली वाखाणणी करून घेत आहे. त्याचबरोबर महाराष्ट्राचे दैवत असलेल्या पंढरीचा प्रवास म्हणजेच हरामखोरीचे खरेखुरे प्रायश्चित्त असाच अनुभव आजही येत आहे. बार्शी–लाईट रेल्वेचा कारभार भारतीय रेल्वेकडे आला. त्यामुळे पडलेल्या उजेडाने डोळे असे काही दिपतात की ते पांढरेच होतात. फरक झाला नाही कसा? झाला तर! पूर्वी त्या मार्गावरील वॅगन्समध्ये हवासुद्धा येत नसे. आता त्याना झरोके पाडले आहेत. त्यामुळे 'सुद्धा' हवा सतत इकडून येते नि तिकडे जाते. हवेची ही तऱ्हा. मग पाणी, भूक वगैरे वगैरेचे वर्णन काय करावे? तो सारा भांडवली खर्च करून तरी काय फायदा? कारण पंढरीचे वारकरी–मग बाप्ये असोत, बाया असोत वा पोरे टोरे–हे मोक्षमार्गाचे पथिक. त्याना लवकरात लवकर मोक्ष मिळावा म्हणून तर रेल्वेने ही खास सवलत ठेवली आहे. रेल्वे जमाखर्चाचे हे एक कलम–कसे नमुनेदार व आदर्श! अपघाताने मेलेली वा पंगू, निराधार माणसे हा चिल्लर खुर्दा... चौथ्या योजनेतील आर्थिक नांदी तर बहारदार झाली. आता मोरारजींचा प्रवेश...

चहाचा वास घ्यावयाचा, पोराबाळाना बाळसे यावे म्हणून दूधमय पाण्याचे तीर्थ पाजावयाचे! वैताग घालवावा म्हणून सिगरेट ओढीत होतो, तर आम्हाला कॅन्सर होऊ नये म्हणून तिचेही फक्त नेत्रसुखच लाभावे अशी सोय झाली. कॅन्सर टळला; व विडीची पाने तोडणाऱ्या मजुराला पाव नया पैसा जादा मिळाला. कारण सिगरेट नाही तर बिडी सही! नसली स्कॉच तर हातभट्टीच सही! आता बिडीने तोंड अधिक सुगंधी बनते म्हणा. पण तो सुगंध काय नुस्त्या बिडीनेच येतो होय? "साखरेत साखर सहकारी साखर......रावांची मिळते मायेची पाखर".....या शब्दात साखर 'अक्षर वाङ्मय' बनली. धान्य ...संध्येतील सत्तावीस नावांप्रमाणे आंबेमोहोर, जिरेसाळ, काळा बहार, कमोद, कोळंबी बिर्यानीचा, पुलावाचा वगैरे वगैरे तांदूळ,


(पृष्ठ ५८ वर)












## सर्वांगपरिपूर्ण अंक

स. न. वि. वि.

दीपावली 'मे' संगीत विशेषांकाची सुरुवात देखण्या मुखपृष्ठाने होउन शेवटहि 'दीपमाला'मध्ये सुंदरतेने सांधला आहे.

लो. टिळकांसारख्या राजकीय धुरंधर नेत्याचे मर्मग्राही विचार, छत्रपति शिवाजी महाराज आणि कवि रविंद्रनाथ टागोर या श्री. श्रीपाद जोशी यांच्या मार्मिक व उद्‌बोधक लेखात कविवर्य रविंद्रनाथ टागोर यांची शिवाजी महाराज यांच्या विषयी आपलेपणाने, जिव्हाळचाने जे मूल्यमापन केले हे जाणून घेताना खरो-खरच आनंद व अभिमान वाटतो.

जितेंद्र अभिषेकी यांनी लताबाईच्या संगीतयशाची कार्यमीमांसा अतिशय सुंदर व मधुर शब्दस्वरांनी करून संगीत विशेषांकावर खरोखरच साज चढविला आहे.

'नजरा नही आंदावे' ही गोपाळकृष्ण भोबे यांची कथा मनाला चटका लावते, तसेच 'कथा कुणाची व्यथा कुणा'—अरविंद विष्णु मुळगावकर यांची कथा वाचून मन व्यथीत होते. संगीतज्ञ कै. पं. ज. वि. पेठे यांच्या आठवणी, संगीतातील परंपरा-वाद—वि. रा. आठवले, संगीतातील काल विशिष्टता—रसिकपिया यांचे लेख खरोखर वाचनीय आहेत. तसेच संगीत राजकीय जल्लोष आणि नेहमीची सदरे अतिशय आवडली.

सारांश 'दीपावली' मे संगीत विशेषांक ही संगीत रसिकांना मेजवानीच असून अंकही संग्राहय आहे.

आपला

मुंबई २६ —दिनकर म. निले.

## मैफिलीची धुंदी

स. न. वि. वि.

'मे'चा संगीत विशेषांक वाचला, फार आवडला. एकाद्या मैफिलीने जशी धुंदी चढावी, कान तृप्त व्हावेत, मन मुग्ध व्हावे, तसेच समाधान तुमच्या संगीत विशेषांकाने दिले. सुरावटीने मैफल रंगते तद्वत चांगल्या लेखांच्या सजावटीने हा अंक रंगला.

आपले संपादकीय धुंद भाषेत असते. यावेळचा अग्रलेख 'शब्द'मय असून त्याचा 'नाद' जाणवला.

'लो. टिळकांचा लेख प्रसिद्ध केल्यामुळे टिळकांचा व्यासंग व त्यांचा एक वेगळाच पैलू आमच्या समोर आला. त्यांचा संगीता-वरील गाढ अभ्यास, संगीत प्रेम व त्यांची रसिकता दिसून आली.

अभिषेकीनी लताची थोरवी योग्य शब्दात सांगितली. भोबे यांची कथा-मांडणी, भाषा, वातावरण सर्वच धुंद करणारे होते. शिवाजी व टागोर, तसेच हुमणे यांचा विनोदी लेखही आवडला.

कोल्हापूर—२ —मु. द. भडभडे

## मीहि बेताल बनलो

स. न. वि. वि.

वेताल मी... बेधुंद मी.. या लेखमाले-तील पहिला लेख दीपावलीच्या दिवाळी अंकात वाचला. नि त्यानंतरचे सर्व अंक मुद्दाम तेवढचासाठीच घेत आलो. भावनाप्रधान माणसे व्यवहारात अपेशी ठरतात. आयुष्यभर लोक त्यांना शिव्याच घालतात. सर्वानाच यश आणि पैसा मिळतो असे नाही. पण त्यातील ज्या व्यक्ति अजरामर ठरतात त्यांचे साऱ्यांचे जीवन सुखापेक्षा दुःखानेच होरपळलेले असावे असेच विधिलिखित असावे काय?

नागपूर —संजय कावरे

## पण श्रोत्यांचे काय ?

निजामी राजवटीत एका ठिकाणी गणेशोत्सवानिमित्त पं. भीमसेन जोशी यांच्या गायनाचा कार्यक्रम झाला. त्या वस्ती तील लोकांनी तो आयोजित केला होता. सारी वॉलंटर-सेनाहि जिथे गाणे होते त्या हॉलच्या मागील बाजूस पण गायक दिसू शकतील अशी रचना असलेल्या खोलीत जमा झालेली होती. कारण वॉलंटरां-शिवाय चहा—कॉफी देणार कशी ?

कार्यक्रम सुरू झाला. जसजसे गाणे रंगू लागते (असे नंतर सांगण्यात आले) तसतसे गायकाचे हातवारे वगैरेहि वाढू लागले. ते सर्व शास्त्रोक्तच होते. जाणकार मंडळी त्या गाण्याची दाद देत त्यात रंगली होती. पण ही वॉलंटर कंपनी मात्र त्या हातवाऱ्यांनी हसून हसून बेजार झाली. हसू आवरणे कठीण ! हॉलमधील वडील-धाऱ्यानी पाहिले तरी आफत! हसता हसता अक्षरशः पोट दुखून काही जणानी लोळणच घेतली होती. तो सारा प्रसंग आठवला की अजूनहि हसू फुटते. तात्पर्य काय की त्या वॉलंटरना गाण्यापेक्षा त्या हातवाऱ्यांनीच खिळविले होते. ती वानरसेना म्हणून तशी वागली.

पण अलिकडे फॅशन म्हणूनहि आम्हाला त्यातलं काही तरी कळतंय अशा आविर्भा-वाने अनेक प्रौढ लोक कार्यक्रमाना जातात. नि नको त्या ठिकाणी दाद देऊन स्वतःचे हसे करून घेतात. असे कां घडते ? एक फार महत्वाचे कारण असे की गाणे आवडत नाही, समजत नाही तो पढतमूर्खाच्याहि पलिकडचा असला पाहिजे अशी सकारण वा अकारण सामाजिक धारणा हिंदुस्तानात सर्वत्र आढळते. ब्रिज-रमीप्रमाणेच गाणे समजणे हेहि एक फॅडच बनले आहे. आणि ज्या चार मंडळीत वावरावयाचे त्यांच्यात आपला तो कमीपणा दाखविणे हे अहं-काराला बाधा आणते. दुसरे त्या वैगुण्यामुळे नाही म्हटले तरी इतर कंपनी तशा गणं-गाना जरा तसेच वागविते.

उत्तमोत्तम गवयांच्या जास्तीत जास्त बैठकी ऐकणे, ग्रामोफोन वा रेडिओचे संगीत विषयक कार्यक्रम कटाक्षाने ऐकण्याचा सराव ठेवणे यातूनच कान

[ पान ५८ वर ]



संगीतकार

# श्री. वामन हरि देशपांडे

—गोपाळकृष्ण भोबे

**आंकडेमोडीसारख्या रुक्ष व्यवसायात राहून—नव्हे एकदा स्वीकारलेला अकौंटसीचा व्यवसाय निष्ठेने करीत असतानाच उभी हयात संगीत शिकण्यात, त्यातील अमृत मिळविण्यासाठी काळवेळ तहानभूक हरपून प्रयास करणाऱ्या मोजक्याच दर्दी संगीतज्ञांपैकी एक मानकरी**

**संगीतावर** अनेक प्रकारे प्रेम करणारा फार मोठा मध्यम-वर्गीय समाज बहुरंगी मुंबापुरीत आढळतो. विशेषत: ठेकेदारांनी घडवून आणलेल्या संगीत मैफलीत हा समाज नेहमी दिसतो. प्रेम या शब्दाची व्याख्या स्थितिकाल परिस्थितीनुरूप बदलत गेलेली आहे. पन्नास वर्षांपूर्वीचे अत्यंत भाबडे प्रेम नंतरच्या पंचवीस वर्षात बदलले आणि अलिकडल्या काही वर्षात तर प्रेमाचे बाजारी स्वरूप 'न पाहवे डोळा' असे काहीसे झालेले आहे. प्रेम, मग ते व्यक्तिमात्रावरचे असो किंवा एखाद्या आवडत्या विषयावरचे असो दोन्ही बाबतीत त्याचा प्रकृतिधर्म सारखाच. येथे फक्त संगीत या विषयावरील प्रेमाचाच विचार करायचा असल्याने मैफलीत आढळणाऱ्या संगीतप्रेमी लोकांची दोन चार उदाहरणे सांगतो आणि मग या लेखातील मुख्य विषयाकडे वळतो.

## हाडाचाव दर्दी कलावंत

पांचाचे पन्नास आणि पन्नासाचे पांचशे कसे होतील या विवंचनेत दिवसभर राहाणारे काही धनिक, मघई पानाचे विडे चघळीत संगीत मैफलीत येतात. हे मोठ्या दराची तिकिटे काढतात. जलसा ऐकायला हे मुळीच येत नाहीत. त्याच्याशी यांचा सुतराम संबंध नसतो. आपल्यासारख्या अन्य काही समव्यवसायिकांची भेट इथे होईल आणि निवांतपणे त्यांच्याशी व्यापारातील गोष्टी बोलता येतील या इच्छेने ते जलशाला येतात; काम झाले की, निघून जातात.

दुपारी भरपूर झोप झालेली असल्याने, रात्री एक दोन वाजेपर्यंत कसातरी वेळ काढायला पाहिजे म्हणून नटून थटून जलशाला येणारा एक वर्ग आहे. यांच्या हातात पानाच्या विड्यानी गच्च भरलेले चांदीचे चकचकीत डबे असतात. यांच्या स्त्रियांच्या अंगावर हिऱ्यामोत्यांचे दागिने असतात. स्वराशी वा लयीशी यांचे अजिबात नाते नसते; पण ठेकेदाराला व संगीतकाराला कोणतीही मदत करायला यांच्या आलिशान गाड्या तत्पर असतात. विशेष करून नृत्याच्या कार्यक्रमाला यांची गर्दी खूप असते. गाण्याच्या वेळी यांच्या राखीव खुर्च्या रिकाम्या असतात.

पूर्वायुष्यात अतिशय दारिद्र्य भोगलेल्या पण दुसऱ्या महायुद्धानंतर एकाएकी श्रीमंत झालेल्या लोकांचे संगीतावरील प्रेम बरेचसे अतिगंडाने पछाडलेले असते. यांच्या बायका किंवा मुले वेळ जात नाही म्हणून, किंवा इतरांशी स्पर्धा म्हणून 'संगीत—साधना' करीत असतात. यांचे संगीत-प्रेम म्हणजे—गळ्यात पडली म्हणून नाईलाजाने करून घेतलेल्या एखाद्या (गरिबाघरच्या) सुनेवर असावे तसे असते. जलशाला हे अशाच वृत्तीने हजर राहातात.

ही झाली संगीतावर प्रेम करणाऱ्याची एक बाजू. आता आपण दूसरी बाजू पाहू. अतिशय रुक्ष व्यवसायात राहूनही संगीत-कलेवर उदंड प्रेम करणारी काही माणसे मी जाणतो. यात काही डॉक्टर्स आहेत, वैद्य आहेत, इंजिनियर्स, बोटींचे कप्तान, वकील, मॅजिस्ट्रेट, जज्ज, पूलीस इन्स्पेक्टर्स, बँक मॅनेजर्स आणि चार्टर्ड अकाऊंटंट्सही आहेत. व्यावसायिक यश लाभायच्या आधी आणि ते लाभल्यानंतरदेखील यातील बरेचसे, कित्येक वर्षे गायनवादन शिकलेले आहेत. "अहो खरं म्हणजे मी संगीतकारच व्हायचा. तशी माझी फार फार इच्छा होती; पण परिस्थितीने मला या रुक्ष व्यवसायात ढकलले!" असे यातील काहीजण कळवळून सांगतात.

यापैकी काही डॉक्टर व वैद्य संगीतकाराला मोफत तपासतात, विनामूल्य औषधेही देतात. ते संगीतकार झाले नाहीत हे बिचाऱ्या संगीतकारावर उपकारच झाले असे म्हटले पाहिजे. डॉक्टर किंवा वैद्य खेरीज करून इतर व्यवसायातील संगीत प्रेमी लोक संगीत-





अनुक्रमणिका

कारला अशी विनामूल्य मदत देतात की नाही हे माहितीत नाही; पण संगीताबद्दल आस्था बाळगणाऱ्या, थोडा अभ्यासही करणाऱ्या अन्य व्यवसायी लोकांचे दोन तीन वर्ग मी जाणतो.

पहिला वर्ग असा आहे की, यांचे संगीतावर प्रेम खरे, संगीताचा यानी मर्यादित अभ्यासही केलेला असतो पण हे अतिशय व्यवहारी तसेच आपमतलबी लोक. अंगाशी न येईल अशा बेताने केवळ स्वतःच्या रंजनापुरते ते संगीत आणि संगीतकार यांच्याशी नाते ठेवतात. बेभान व्हायची यांची वृत्ति नाही.

दुसरा वर्ग असा की, बाळपणी आपण संगीतकार व्हावे ही त्यांची सुप्त असलेली इच्छा कोणत्या तरी दडपणामुळे विफल झालेली असल्याने–सूड म्हणून असेल कदाचिन–बाह्यात्कारी स्वतः संगीताशी कोणतेही नाते न जोडता आपल्या मुलाबाळाना ते यावे, त्यानी रस घ्यावा यासाठी ते हजारो रुपये खर्च करतात.

आणि तिसरा वर्ग असा आहे की, परिस्थितीने अन्य व्यवसाय पत्करावा लागला याचा खेद न मानता आपला तो व्यवसाय यशस्वी करून हे संगीतालाही तेवढेच महत्व देतात. आपल्या कुटुंबाने आणि साऱ्या परिवाराने आपल्याबरोबर तो रस घ्यावा यासाठी जीव तोडतात. या ठिकाणी ज्यांच्यासंबंधी मला विस्ताराने लिहावयाचे आहे ते 'चार्टर्ड अकाउन्टंट' सर्वश्री वामन हरि देशपांडे हे या वर वर्णन केलेल्या तिसऱ्या वर्गातील होत.

मुंबापुरीतील प्रतिष्ठित संगीत सृष्टीशी संबंध आल्यापासून मी वामनरावांना पाहतो आहे. वास्तविक संगीतकार म्हटला की त्याच्याशी शक्य तितक्या लवकर आपला परिचय व्हावा यासाठी मी नेहमीच धडपडतो आहे; परंतु संगीतकाराला लागणारे किंवा वरवर दिसणारे 'तसे' कोणतेही व्यक्तित्व वामनरावात नसल्यामुळे त्यावेळी त्यांचा परिचय करून घ्यावा असे मला वाटले नाही. वामनरावांसारखे दिसणारे सामाजिक रीतीला अनुसरून कोट पाटलोण घालणारे, किंवा धार्मिक कार्याला वा 'संडेव्हिजीटला' धोतर नेसून जाणारे–आणि इमानेइतबारे आपला व्यवसाय सांभाळून संगीताबद्दल आस्था बाळगणारे असे पुष्कळ गृहस्थ माहितीचे होते. तेव्हा वामनराव या व्यक्तीविषयी प्रथमदर्शनी तरी विशेष काही वाटायचे कारण नव्हते.

एकदा श्री. केशवराव भोळे यांच्याकडे त्यांची संगीतातील काही गंभीर प्रश्नावरील चर्चा–वजनदार साहित्यिक भाषेत—चालू असताना मी त्याना पाहिले. ती चर्चाही कुतूहलपूर्वक ऐकली, आणि हे वामनराव म्हणजे आपण समजत होतो त्याहून एक निराळी असामी आहे हे त्याच क्षणी लक्षात आले. त्यांचा संगीताचा व्यासंग खूप वर्षांचा असून ते श्रीमती मोगूबाई कुर्डीकरांकडे तालीम घेत असल्याची माहिती केशवरावानी दिली.

पुढे भीमसेन जोशी यांचा परिचय झाल्यानंतर गायनाच्या कार्यक्रमास पुण्याहून मुंबईस आल्यावेळी तुम्ही कुठे उतरता, असे त्यांना विचारले; तेव्हा 'आपले वामनराव देशपांडे यांच्याकडे' असे त्यांनी सहज उत्तर दिले. भीमसेनचे उत्तर सरळ



होते. आपले वामनराव म्हणजे तुम्हा आम्हा सर्व संगीतकारांच्या किंवा संगीताशी घनिष्ट संबंध असलेल्या सर्वांच्या चांगल्याच परिचयाचे असलेले वामनराव असा त्यांच्या बोलण्याचा अर्थ होता.

मी थोडासा ओशाळलो; कारण संगीताच्या व संगीतकारांच्या दुनियेत जरी मी वावरत होतो तरी तोपर्यंत वामनरावांचा नि माझा परिचय झालेला नव्हता. तो करून घ्यावा किंवा करून द्यावा असे माझ्याजवळही काही नव्हते. पण पुढे थोड्याच दिवसानी तो एकाएकी झाला. तो कसा झाला हे मला आठवत नाही; परंतु तो झाल्यानंतर मात्र थोर घरंदाज गवय्याना संगीताबद्दल जेवढी कळकळ असते तेवढीच किंबहुना जास्तच—संगीताबद्दल आणि संगीतांतर्गत अनेक विषयांबद्दल–कळकळ वामनरावाना असल्याचे मला दिसून आले.

वामनरावांचे गाणे आकाशवाणीवरून मी अनेक वेळा ऐकलेले आहे. जेवढ्या वेळा ऐकले त्यात सातपेक्षा अधिक वेळा "प्यारी पग हौले" हा बिहागड्यातील ख्याल ऐकलेला आहे. आणि 'कृपा करून वामनरावानी आता ही चीज नि बिहागडा राग गायची तीन वर्षे तरी बंदी करा'–असे पत्र आकाशवाणीच्या संगीत विभागाला पाठवायचे तीव्रतेने मनात येऊनही ते न पाठविता गप्प राहिलेलो आहे. कारण वामनरावांच्या बाबतीत असे आडून काही करणे म्हणजे ते महत्पाप केल्यासारखे होय. संगीतावर पूज्य भावनेने, निरपेक्ष बुद्धीने पदरमोड करून अपार प्रेम करणारी त्यांच्यासारखी माणसे विरळा याची मला त्यांच्या थोड्याशाच परिचयाने जाणीव झाली होती.

वामनरावांचे गाणे–त्यांच्याच भाषेच्या वर्णनात सांगायचे झाल्यास–'रोमॅन्टिक' नाही. मनमानी वळविता यावा असा त्यांचा आवाज लवचिक नाही. विविध जातीच्या स्वरालंकारांचा मुक्त आविष्कार त्यांचा गळा करू शकत नाही तरीही संगीतावरची त्यांची नेक अणि भक्तिभाव त्यांचे गाणे ऐकताना प्रतीत होतो. आकाशवाणीवर त्यांचा कार्यक्रम केव्हाही असला तरी त्या भावनेनेच मी न चुकता तो ऐकतो. आणि संगीतासाठी या गृहस्थाने आतापर्यंत जे काय केले याचा लहानसा आढावा घेतला तर कुणीही सहृदय रसिक त्यांना धन्यवाद देत तो ऐकेल याबद्दल माझी खात्री आहे.

## वडिलांनी दिलेला संगीत–वारसा

वामनरावांचा बालपणीचा काळ हा प्रपंची लोकांना संगीताबद्दल फारसे चांगले मत नसलेला काळ होय; पण वामनरावांचे भाग्य असे की, त्यांच्या वडिलांनी गाण्याबद्दल नुसते प्रेमच बाळगले नाही तर ते थोडे फार गाणे शिकलेही होते. त्यांच्या सर्व घराण्यालाच गायन-वादन कलेबद्दल नितांत प्रेम होते. त्यामुळे संगीताच्या उपजत आवडीबद्दल वामनरावांना प्रतिबंध तर झालाच नाही, उलट उत्तेजनच मिळत गेले. संगीताची दीक्षा त्यांना बालपणापासून मिळाली.

संगीतातील त्यांची गुरुपरंपरा लांबलचक आहे. सुरुवातीला खुद्द त्यांच्या वडिलांनी त्यांना काही ध्रुपदे शिकविली. पुढे शाळेत गेल्यावर श्री. केशवबुवा मटंगे, श्री. रामभाऊ लिमये ( श्री. मधु लिमये यांचे वडील ) ध्रुपदिये शंकरबुवा अष्टेकर या गुरुजनांकडून थोडे शिक्षण मिळाले.

मॅट्रिक झाल्यावर वामनराव पुढील शिक्षणासाठी मुंबईला आले. गाणे शिकण्याची हौस दांडगी होती. मुंबई हा तत्कालातदेखील गाणे शिकविणाऱ्या लोकांचा बालेकिल्ला होता. पहिल्या गुरुपरंपरेत

(अनर्थसंकल्पमाला)




लोका:सांगे...

बसणारे श्री. शंकरराव कुळकर्णी नांवाचे (हे बाळा गुरुजींचे शिष्य होते.) परळला राहाणारे गायन शिक्षक आपले संगीतातील गुरू म्हणून वामनरावानी निवडले. या वेळचा त्यांचा दिनक्रम सांगण्यासारखा आहे. पहाटे उठून स्नान वगैरे आटोपून सव्वापांचची ट्रॅम गाठून ते परळला शंकरराव अष्टेकरांकडे गाण्याच्या तालमीला जायचे. तिथून निघून साडेआठला फोर्टमध्ये अकौंटसीचा क्लास गाठायचे. आणि दहा वाजता क्लास संपल्यावर रस्त्यातच काहीतरी खाऊन घेऊन साडेदहा वाजता कचेरी गाठायचे.

मधले काही महिने ते श्री. यादवराव जोशी यांच्याकडे शिकले, परंतु ही दगदग त्याना फार दिवस सोसली नाही. ते आजारी पडले; त्यांना गावी जावे लागले; दीर्घ काळाची विश्रांती घ्यावी लागली. प्रकृती सुधारल्यानंतर पुन्हा मुंबई मानवणार नाही या तज्ज्ञांच्या सल्ल्यावरून त्यानी पुण्याकडे मोर्चा वळविला.

तत्कालात अकौंटन्सी जाणणारे लोक फार कमी असल्याने नवी नोकरी मिळविण्यात त्याना कधीही अडचण आली नाही. ती तावडतोब मिळाली. पण त्यांच्या मनासारखा गायन–गुरु शोधण्याला मात्र बरेच दिवस गेले. आतांपर्यंत जे चार गुरु झाले त्या परंपरेत शोभणारा गुरु अजून सांपडत नव्हता. पुण्याच्या गल्लीबोळात संगीत विद्यालये होती. त्यांच्या चालकांची ओळख घेऊन पाहिली पण मन लागेना. एका रात्री श्री. सुरेशबाबू माने यांच्या गाण्याची मैफल ऐकून मन मोहरून गेले. शिकायचे तर अशाच गुरुजवळ असा निश्चय करून वामनराव सुरेशबाबूंकडे गेले.

'यापूर्वी आपला गाण्याचा अभ्यास झालेला असून पुढचे शिक्षण तुमच्याकडे घ्यावे अशी इच्छा आहे,' असे जरी त्यानी सुरेशबाबूंना सांगितले तरी हा पहिला वहिला सुशिक्षित शिष्य पत्करताना 'आतापर्यंतची तुमची तयारी दाखवा, ती ऐकल्यानंतर मगच मी शिकविण्याचा विचार करीन!' या सुरेशबाबूंच्या उत्तरानंतर त्यांच्यासमोर जे वामनराव गायले ते ऐकून सुरेशबाबू म्हणाले—"वामनराव, आमची गायकी तुमच्या गळ्यावर चढवायला आधी मला तुमचा गळा तयार करावा लागेल; व त्याला बराच कालावधीही लागेल. तुमची तशी तयारी असल्यास शिकवितो!"

वामनराव तयार झाले. गुरु सांगतील तसे शिकू लागले. इतकेच नव्हे तर नोकरीव्यतिरिक्त मिळणारा सारा वेळ ते सुरेशबाबूंच्या संगतीत घालवू लागले. पहिले एक वर्ष केवळ बारा स्वरांची साधना करताना त्यानी कसलीही कुरकुर केली नाही. झटपट रंगारी होण्याची त्यांची मुळीच इच्छा नव्हती.

सुरेशबाबूंकडून वामनरावाना थोडाच काल तालीम मिळाली पण १९४० अखेरपर्यंत एकंदर बारा वर्षे वामनराव पै. अब्दुलकरीम खांसाहेबानी प्रसारित केलेल्या गायकीचे–म्हणजेच ज्याला किराना गायकी असे म्हणतात त्या गायकीचे–अनुकार करू पहाणारे पथिक होते. दिवसातले चौदा चौदा तास किराना घराण्यातील कलावंतांच्या सहवासात त्यानी घालविले. व्यावसायिक

निमित्ताने पुढे मुंबईत स्थायिक झाल्यानंतर पै. अमानअली खांसाहेब, पै. वशीरखांसाहेब, कै. गोविंदराव टेंबे यांच्याजवळही त्यांनी थोडे थोडे शिक्षण घेतले; पण ज्यासाठी इतकी वर्षे अट्टाहास केला ते गवसले नाही किंवा मनासारखे झाले नाही ही रुखरुख आणि टोचणी त्यांच्या मनाला सतत जाचत राहिली.

## गुरुबिन ज्ञान नही

त्यांच्या मनातील या शल्याची, त्यांचे जिव्हाळ्याचे स्नेही कै. गोविंदराव टेंबे याना जाणीव झाल्यावांचून राहिली नाही. कोणत्या मार्गाने गेल्यास योग्य मुक्काम गाठला जाईल, किंवा त्यांच्यासारख्यांच्या गळ्याने कोणत्या पद्धतीच्या वळणाने गेले पाहिजे हे गोविंदरावांसारख्या चाणाक्ष संगीतकारांच्या लक्षात यायला मुळीच वेळ लागला नाही. त्यांनी त्याना मार्ग सुचविला. ज्यांच्या परिणामाला धक्का लागू न देता, निरुत्साही न करता 'अतरोली' घराण्याच्या गायकीत लक्ष घालून त्या पद्धतीचा अभ्यास करण्यास प्रवृत्त केले.

अतरोली घराण्याच्या पद्धतीचे काही प्राथमिक धडे गोविंदरावांनी दिले. त्यानंतर त्या घराण्याचे एक वंशज पै. नत्थन खांसाहेब यांच्याकडे त्यांनी थोडी तालीम घेतली. आणि नत्थन खांसाहेब गेल्यावर गोविंदरावांच्याच सल्ल्याने या घराण्यातील सुप्रतिष्ठित गायिका श्रीमती मोगूबाई कुर्डीकर यांच्याकडे त्याना तालीम घ्यायला सुरुवात केली. मोगूबाई यांच्याकडे थोडी थोडकी नव्हे तर बारा वर्षे वामनराव शिकले. याशिवाय कै. वेहेरेबुवा, गोखलेबुवा, श्री. वामनराव सडोलीकर यांच्याकडूनही थोडा थोडा प्रसाद त्यांनी मिळविला. म्हणजे एकंदर तेरा गुरुजनांकडून आपल्या आयुष्यातील जवळजवळ चाळीस वर्षे त्यांनी गाण्याचे निव्वळ शिक्षण घेण्यात घालविलेली आहेत.

एवढे शिक्षण घेण्याकरिता जो हजारो रुपयांच्या व्यय झाला त्या मानाने आतापर्यंत आर्थिक फायदा काय झाला याचा हिशेब –हिशेब तज्ज्ञ–वामनरावांनी कधीही ठेवला नाही. त्यातल्या त्यात आनंदाचा भाग म्हणजे आपल्या कंपनीच्या कामासाठी ते शिकारपूर येथे गेले असताना तिथल्या एका मंडळाने लावलेल्या गाण्याच्या चढाओढीत त्यांनी सहज भाग घेतला आणि अनपेक्षितपणे ते सुवर्णपदकाचे मानकरी झाले. तसेच एकेकाळच्या 'बांबे म्यूझिक सर्कल'तर्फे झालेल्या संगीत–चढाओढीत यशस्वी होऊन त्याना 'पार्कर–पेन' बक्षीस मिळाले होते. प्रत्यक्ष आर्थिक लाभ म्हणजे रेडिओच्या मधून मधून मिळणाऱ्या कार्यक्रमातून मिळालेली तुटपुंजी रक्कम. या व्यतिरिक्त त्यांनी मिळविलेल्या विद्येच्या मानाने आणि ती मिळविण्याकरिता केलेल्या खर्चाच्या मानाने लाभाचा हिशेब शून्यातच दाखवावा लागेल.

मग हा सारा खटाटोप वामनरावांनी केला कशासाठी? असा प्रश्न साहजिकच उभा राहातो; पण थोड्याशा विचाराअंती त्याचे जे उत्तर आपल्याला सापडते ते अगदी सोपे आहे. केवळ आत्मानंद हेच या प्रश्नाचे उत्तर आहे. बुद्धिवादी माणसाला त्यातच अपार समाधान असते.

संगीत हा व्यवसाय म्हणून त्यांनी पत्करला असता तर त्यात ते अयशस्वी झाले असते असे मला मुळीच वाटत नाही. मैफलीचा गायक म्हणून कदाचित त्याना यश मिळाले नसते पण संघटना चातुर्य, व्यवस्था, अध्यापन, कार्य जिद्दीने तडीला नेण्याची चिकाटी इत्यादि सामर्थ्य त्यांच्यापाशी मुबलक असल्याने त्या जोरावर एखादी संगीत संस्था काढून आज आहेत त्यापेक्षाहि ते अधिक सुखी झाले असते. संगीत क्षेत्रात अशीहि बरीच माणसे आज मुंबईत आपला आब राखून आहेत; परंतु वामनरावांनी आपल्या स्वीकृत धंद्याशीच इमान राखले. आत्मानंदासाठी केलेल्या साधनेला त्यांनी व्यवसायाच्या रूपात राबविली नाही. आपल्या व्यावसायिक प्रतिष्ठेला बाध येऊ नये–म्हणून असेल कदाचित–त्यांनी सार्वजनिक जलशातही भाग घेतला नाही. हे जे त्यांनी काही केले ते जाणीवपूर्वक व निष्ठापूर्वक.

इतरांसाठी मात्र खूप केले व करीत आहेत. संगीतासाठी व आपल्या आवडत्या संगीतकारासाठी सढळ हाताने खर्च करणारा, त्यांनी दिलेल्या तृतीच्या ढेकरीत निर्व्याज मनाने आनंद मानणारा त्यांच्यासारखा संसारी माणूस माझ्या पाहाण्यात नाही. संगीताच्या किंवा संगीतकाराच्या हिताची एखादी गोष्ट घडत असली की तिला दुजोरा द्यायला आणि या बाबतीत काही अडचण येत असल्यास वाटेल ती मदत करायला वामनराव एका पायावर सदैव तयार असतात.

## याचसाठी केला होता अट्टाहास...

'घरंदाज गायकी' हा त्यांचा एकमेव ग्रंथ म्हणजे गेल्या पंचेचाळीस वर्षात त्यांनी केलेल्या त्या विषयावरील चिंतनाचा व व्यासंगाचा परिपाक आहे. महाराष्ट्रात प्रचलित असलेल्या उत्तर हिंदुस्थानी संगीत पद्धतीतील विविध घराण्याच्या गायन शैलीची टीकात्मक चर्चा या ग्रंथात त्यांनी केलेली आहे. याशिवाय वरा-

(अनर्थसंकल्पमाला)




पांढऱ्या हत्तीला सोनेरी मलिदा...

ण्यांची उत्पत्ती, त्यांच्या प्रणाली, त्या वनग्याची तत्वे, त्यातून श्रवणगोचर होणारे सौंदर्यशास्त्र आणि रचनाशास्त्र यांचे मार्मिक विवेचन उच्च भूमिकेवरून केलेले आहे. अर्थातच ही तात्विक चर्चा आत्मनिष्ठ असल्यामुळे तीत मतभेदाला पुष्कळ जागा आहे. त्यात काही चर्चा नि:पक्षपाती वाटत नाही. इतर ठिकाणी सडेतोड-पणे विचार व्यक्त करणारे वामनराव (फावड्याने ओढलेली माती आपल्या पायाकडे यावी या न्यायाने) अत्रोली घराण्यासंबंधी सांगताना बरेच मृदु तसेच विशेष अंतर्मुखही झालेले वाटतात.

ज्या किराना घराण्याच्या 'मंगलमय वातावरणात' त्यानी पूर्वायुष्यातील एक तप घालविले त्या घराण्याच्या गायकीची चर्चा करताना त्यानी थोडासा अन्याय केलेला आहे असे त्यांचा हा ग्रंथ प्रसिद्ध झाल्यावर बरेच किरानेवाले म्हणत होते. तसे आरोपही झालेले आहेत. या ग्रंथानंतरही संगीत विषयक झालेल्या अनेक परिसंवादातून, व्याख्यानातून आणि स्फूट लिखाणातून काही पाश्चात्य लेखकांच्या सिद्धांतांचा आधार घेऊन वामनरावानी जे जे वादग्रस्त मुद्दे उपस्थित केले त्यातील अंतर्गत सूरही अतरोली गायकीचे श्रेष्ठत्व प्रस्थापित करणारा होता असेही काही अन्य टीकाकाराना वाटले.

परंतु पूर्ण समज आल्यानंतर मनावर होणाऱ्या एखाद्या दीर्घकालीन संस्काराचा परिणाम हा शाश्वत परिणाम मानला जातो. हा परिणाम पूर्वीच्या सर्व खुणा पुसून टाकायचा प्रयत्न करतो. अशा बुद्धिमंतांनी कितीही उच्च भूमिकेतून तात्विक चर्चा केली तरी त्यांचे भान नि:पक्षपाती राहातेच असे म्हणता येत नाही. यात काही फार मोठा दोष आहे असे मला वाटत नाही. तो मनुष्यस्वभावच आहे. किरान्याची महाराष्ट्रात प्रचलित असलेली गायकी 'एकांगी' आहे आणि अतरोलीची तशी नाही असे विधान बिनदिक्कत करता येणार नाही. तसे पाहिले तर महारा-ष्ट्रात लोकप्रिय असलेल्या प्रत्येक घराण्याच्या गायकीची सूक्ष्म चिकित्सा केल्यास त्यात एकांगीपणा हा आढळतोच. निर्दोष आणि सर्वांगीण परिपूर्ण अशी कोणतीही गायकी नाही. या सर्व गायकीतील उत्तम विभागांचे रसायन करून ते आपल्या गळ्यावर चढवून स्वतंत्र बुद्धीने तयार केलेली अलीकडील सवरंगी गायकीच श्रवणीय वाटते. असो!

अशा मतभेदांना अनेक जागा असल्या तरी आपल्या किचकट आणि क्लिष्ट व्यवसायी व्यापातून वेळ काढून, असे विविध वाद-ग्रस्त प्रश्न विचारपूर्वक मांडून, संगीतातील विचारवंतांच्या बुद्धीला सातत्याने चालना दिल्याबद्दल आणि निर्भिडपणे आपली मते व्यक्त केल्याबद्दल वामनराव लाख वेळा धन्यवादास पात्र आहेत. संगीत हा विषयच त्याना इतका प्रिय आहे की, काही दिवसांपूर्वी एका ठिकाणी जमलो असताना जाता जाता मी त्याना काही शंका विचारल्या तर ते केवढे रागावले. म्हणाले–"असे उडत उडत वाटेत मला प्रश्न विचारत जाऊ नका. या बाबतीत खरोखरीच तुम्हाला अगत्य असेल तर वेळ काढून घरी या. आपण जेऊ, खाऊ आणि वाटेल तेवढा वेळ शांतपणे चर्चा करू. गाणे ही अत्यंत पवित्र गोष्ट मानतो मी!"

गाण्याबद्दल नुसते बोलणारे, फुकटात करमणूक करून घेणारे आणि दानावर दक्षिणा म्हणून गायकाकडूनच चहा फराळ (आणि पान सुपारी देखील) उपटणारे फुकट फौजदार मी अनेक पाहिलेले आहेत. हे लोक गाण्याचे शौकिन–आणि दर्दी–खरे पण क्रिया-शून्य. यंव झाले पाहिजे आणि त्यंव झाले पाहिजे अशा उंटावरून शेळ्या हाकण्याचे काम ते करतात. पण जरा बाजूला झाले की मग आपला व्यवसाय भला की आपण भला अशा वृत्तीने वागतात.

वामनरावांचे तसे नाही. संगीतातले काही बरे आढळले की, त्यांचा जीव हरखून जातो. त्यांची सौंदर्यवेधी तितकीच चिकित्सक दृष्टी ते चांगले का, याचा शोध घेऊ लागते. मग ते अनेकांजवळ आपल्या मनातली शंका विचारतात, त्यावर चर्चा करतात, सिद्धांत बांधतात; काही सांपडले तर आनंदित होतात.

मध्यंतरी राज्य सरकारतर्फे 'महाराष्ट्र गायक' (किंवा गायिका) अशा नांवाची पदवी कुणातरी ख्यातनाम तपस्वी महाराष्ट्रीय संगीतकाराला द्यावयाची आहे अशी एक बातमी उठली. एका जलशात आम्ही जमलो असताना आपआपसात काही ख्यातनाम कलावंतांची नांवे सुचविली. ज्या एका व्यक्तीच्या नांवावर काही जणानी जोर दिला त्या व्यक्तीने भर मैफलीत कारण नसताना वामनरावांचा अपमान केलेला होता; परंतु वामनरावानीदेखील त्या पदवीसाठी त्याच नांवाला अनुमोदन द्यावे हे मला रुचले नाही. मी त्याना तसे स्पष्टपणे बोलून दाख-विले. त्यावर वामनराव म्हणाले–"हे पहा, तुम्हाला ती घटना अपमानास्पद वाटत असेल, पण मला वाटत नाही. या पदवीला तीच व्यक्ती सर्वस्वी योग्य आहे. अपमान झाला असेल तर तो माझा वैयक्तिक आहे. त्याचा या गोष्टीशी काही संबंध नाही. आणि अशी एखादी चांगली प्रथा पाडणारी गोष्ट घडत असेल तर घडू द्या की, एका प्रथेला चालना तरी मिळेल!"

वामनरावांचा तो मनाचा मोठेपणा पाहून मी थक्क झालो. ज्या व्यक्तीने भर मैफलीत विनाकारण त्याना (आणि मैफलीत बसलेल्या इतर अभ्यासूंना) लागेल असे कडक शब्द उच्चारले,

[ पृष्ठ ४९ वर ]

**रेल्वे अपघातांचा 'हंगाम' सुरू झाला**

**प्रवाशांच्या सुखसोयींसाठी रेल्वे अर्थसंकल्पात लक्षावधी रुपयांची तरतूद !**

मी पहात होतो.
तुझे डोळे एका वेगळ्या आनंदाने चमकत होते.
आपली डोळ्यांची भाषा कुणालाच कळणारी नव्हती.
एक काव्य वाचीत होतो.
त्याची भाषा, लिपी, शब्द,
(कदाचित माझेही).
आपण आपल्या जीवनातील
अर्थ सारे सारे वेगळे होते.

# अशापित मी

—प्रकाशचंद्र करंदीकर



**आज** लिहायचा मूड आलाय्.

मध्यरात्रीचा समय आहे.

सारी पूर्वरात्र मधाळ आठवणींनी चिंब झाली.

मी उठतो. खिडकी उघडतो. भुरुभुरु वहाणारा गार ओलसर वारा सर्वांगाला कुरवाळू लागतो. वारकरी ढग आपल्या मार्गाला लागले आहेत. निरभ्र आभाळात आता चांदण्याचा मोतिया फुलला आहे. पूर्वेकडे गेलेल्या डाव्या हाताच्या रस्त्यावर पावसात गारठलेली दुतर्फा झाडे अंग आखडून उभी आहेत. भिजलेल्या रस्त्यावर चांदण्यांचा सडा पसरला आहे.

सारं काही शांत आहे. रात्र सामसूम आहे. तारे सामसूम. निद्रिस्त जग सामसूम. वाऱ्याला कसला तरी मंद मंद ओलसर गंध आहे. हा गंध मी नाकाने पितो आहे. आज मन कसं फुलून आलंय्. मोहरून आलंय्. मनाला जणू परिसस्पर्श होऊन सुवर्णकांति चढलीय्. फुलाचा देह लाभून ते मधुगंधी झालेय्. परीचे पंख फुटून ते तरंगू लागलेय्.

कशासाठी ही प्रसन्नता? कुणास ठाऊक! कुणास ठाऊक.......

☆☆

ठिबकणाऱ्या वेदनेवर कुणीतरी फुंकर घालायला हवं असतं. जवळ.

झुळझुळू वहाणाऱ्या आनंदाचे कुणावरतरी चार शितोडे उडवावेसे वाटतात. अशावेळीहि कुणीतरी हवं असतं. जवळ. अगदी जवळ.....

अनुक्रमणिका

मी तिच्याकडे पहातो. तिचा चेहरा किती शांत आहे! स्निग्ध पापण्यांआड स्वप्नांचा लपंडाव चालला असेल. तिचा हळुवार वहाणारा श्वासोच्छ्वास तिच्यासाठी कुठल्या तरी दूर देशच्या शालिमार बागेतून सुगंधाचा नजराणा आणीत असेल.

काय असेल तिच्या मनात? उठवावी का तिला?

मन म्हणतं, नको! एखादा सुखाची गाढ निद्रा घेत असेल तर त्याला उठवू नये. मग अशावेळी वाटते, काहीतरी लिहावं. शब्दांना मग पंख फुटतात. त्यांना मोराचा पिसारा मिळतो. कोकिळेचा कंठ फुटतो. हंसाची डौलदार गति येते.

मी तिचे विस्कटलेले, कपाळावर आलेले केस नीट मागे सारतो. तिच्या गालाचे अगदी हळूच ओझरते चुंबन घेतो. तिच्या अंगावर चादर व्यवस्थित पांघरतो.

पोटात कालवल्यासारखं होतं. ऊर भरून येतो. गळा दाटून येतो. पापण्यांच्या कडा ओलावतात. माझ्यासाठी, माझ्या संसारासाठी ती बिचारी खूप राबली. खपली. खस्ता खाल्या. कितीतरी कष्ट घेतलेत नि घेते आहे. . . दिवसरात्र . . .

माझी गृहिणी, सल्लागार, एकान्तातली सोबती, माझ्या कवितांची वाचक...

☆ ☆

लेखणी. माझी दुसरी सखी. जी मला जादूच्या सतरंजीवर बसवते, दूर दूर कुठेतरी नेते. माझ्या डोळ्यांवरून जी हात फिरवते नि एक अनोखी दुनिया दाखवते. जेथे मी माझा रहात नाही. देह गळतो. वासना–विकार जळतात. एक दिव्य साक्षात्कार घडतो. त्या दुनियेत कधी काटे हसतात; तर कधी फुले रडतात.

मनामध्ये एक गुहा असते. अलिबाबाच्या गुहेसारखी. मी लेखणी हातात घेतो. त्यासरशी कुठची तरी अज्ञात शक्ति 'खुल जा सिम् सिम्' चा मंत्र पुटपुटते. गुहेचा दरवाजा उघडतो. कुणीतरी रडत असतं. कुणीतरी विव्हळत असतं. कुणाचं-तरी मूल आक्रंदन . . . . . . . रस्त्यावरची ती वेडी......तिला कुणी सट्टयाचे आकडे विचारतात. एखादा तिच्या वेडेपणाचा फायदा घेऊन तिच्यावर बलात्कार...... नवऱ्याला सोडून दुसऱ्याचा हात धरून पळून जाणारी ती कुलटा......पोटच्या पोरांनी टाकून दिलेली ती वृद्ध विधवा आई. . . . . . . दुसऱ्याची शेज सजवणारी, नवऱ्याला फसवणारी अन् तरीहि पतिव्रता मिसेस्.....छट् आज हे नकोय्. आज लेखणीला मगरीचे आंसू ढाळायचे नाहीत. पर्वताएव्हढ्या दुःखाखाली छाती दबून गेलीय. आज सौख्याचे चार सुवर्णकण हवेत. सुखाचा, प्रीतीचा, तृप्तीचा एक हुंकार उमटायला हवा. अफाट खारट समुद्राच्या पोटात एकच का होईना पण मोती मिळावा.

आज असं कां व्हावं समजत नाही. उमजत नाही.

अन् तुझी आठवण झाली. वाटलं आज आपलीच कथा लिहावी. स्वतःची स्वतःच्या अनुभूतीशी इमान राखून. खरीखुरी. साधीभोळी. जी सत्य आहे. शिव आहे. सुंदर आहे. तू हसशील, म्हणशील, आपल्या कथेत एव्हढं काय आहे विशेष?

खरंच, आपल्या कथेत सांगण्यासारखं असं काय आहे? माणूस जन्मला, चार पुस्तकं शिकला, नोकरी धंद्याला लागला, लग्न केलं, सात–आठ पोरांचा बाप झाला नि अखेर एके दिवशी मेला. बस्स्! संपलं सारं. अशा तऱ्हेच्या नीरस गोष्टीत सांगण्यासारखे तरी काय आहे?

—पण कित्येकदा साध्या गोष्टीतहि आशय असतो म्हणतात. व्यर्थ गोष्टीत अर्थ गवसतो. साध्या शुल्लक गोष्टीतहि सौंदर्य दडलेलं असतं.

☆ ☆

तू आज भेटलीस. कितीतरी दिवसांनी.

कधीकाळी आपण कुणावर तरी जीव तोडून प्रेम केलं होतं, याची जेव्हा रोजच्या जीवनात आठवणहि उरत नाही, इतक्या वर्षांनी . . . . .

फुटपाथवर लोकांची गर्दी. असंख्य अपरिचित चेहरे.

धक्काबुक्की. गोंधळ गडबड. वाहनांचा गजबजाट. एकच कोलाहल, गोंगाट.

एव्हढ्या गर्दीतहि तू मला ओळखलंस. मी तुला.

तुझ्यासोबत तुझे यजमान. अन् लहानगा सुनिल.

मी. माझी पत्नी. अन् आमची चिमुरडी अजिता.

मला पाहून तू हसलीस. थांबलीस. थोडा वेळ का होईना, आपण बोलत राहिलो. त्यातच तुझ्या पतीचा, माझ्या बायकोचा ओळख करून देण्याचा सोहळा. सारं काही औपचारिक. तू किती बदलली होतीस. अंगाने जरा सुटलीसच. गुबगुबीत मांजरीसारखी वाटलीस. (मी बदललो का ग? की होतो तसाच आहे?)

मी पहात होतो. तुझे डोळे एका वेगळ्याच आनंदात चमकत होते. (कदाचित् माझे देखील!) आपली डोळ्यांची भाषा कुणालाच कळणारी नव्हती.

आपण आपल्या जीवनातील एक काव्य वाचत होतो.

त्या काव्याची भाषा वेगळी होती. लिपी वेगळी होती. शब्द वेगळे होते. अर्थ वेगळा होता.

त्या जुन्या काव्यावर आपण ओझरता दृष्टिक्षेप टाकत होतो. भरभर......

फार फार वर्षांपूर्वीची गोष्ट होती. एकदा किनई. . . .

आपलं हृद्गत ओठांवर आणण्यासाठी आपण धडपडत होतो. तडफडत होतो.

अन् ते काम मग आपल्या लबाड डोळ्यांनीच केलं.

आपण एकमेकांची वाट पहायचो....

ती जीवघेणी प्रतीक्षा.............,

ती आर्त ओढ.........कासावीस होणारा जीव.

ते हितगुज. कधी बोलके. कधी मुके.

स्वप्नांच्या फुलवाती जाळत जागवलेल्या रात्री.

ते मोडलेले सुस्कारे. टाकलेले उसासे..

कधीहि तृप्त न होणारी अतृप्ति.......

निरोपाच्या वेळी पाणावणारे डोळे.

पुनः पुनः भेटीसाठी आसुसलेला जीव.

दाहक तरीहि गोड, हवीहवीशी वाटणारी वेदना. तडफड. हुरहूर.

शरीराच्या कणाकणातून अंगार उसळवणारा तो दाहक स्पर्श.

परस्परांना दिलेली वचनं. केलेले वायदे........

घेतलेल्या आणाभाका. शपथा.

तू मला म्हटली होतीस, मक्या, तुझ्याशिवाय मी जगू शकणार नाही.

मी तुला म्हटलो होतो, तुझं जर दुसऱ्याशीं लग्न झालं तर मी जीवच देईन.

पण. . . . .

पण अखेरीस तुझं लग्न झालं. दुसऱ्याशी.

अन् मग अनेक रात्री आपल्या उशा अश्रुसिंचनाने भिजल्या.

सशाच्या वेगाने दौडणाऱ्या काळाने जखमी हृदयाला मलमपट्टी केली.

रडू येत होतं. पण रडलो नाही. ओरडावेसं वाटत होतं. पण ओरडलो नाही.

वेदना होत होत्या. पण त्या वेदनांतून आपला नवा जन्म होत होता.

अखेर काही दिवसानी माझ्याहि लग्नाचा बँडबाजा वाजला.

तुझ्यात नि माझ्यात किती मोठं अंतर पडलं.

शारीरिक. मानसिक. नैतिक. भौगोलिक अन् काळाचेहि.

अखेरीस आपण दोघेहि सुखरूप राहिलो. जिवंत राहिलो.

मरायला तू काही लैला नव्हतीस, कीं मी मजनू नव्हतो.

आज हे सारं सारं आठवलं. मला. अन् कदाचित् तुलादेखील.

आज त्या देशाची, त्या स्वप्नभूमीची आठवण झाली.

तो देश कधीच भूकंपात जमीनदोस्त झाला. जमिनीत खोलवर गाडला गेला.

आता कधीतरी आठवलाच तर आपला हा मूर्खपणा. प्रेमात पडण्याचा.

आता नवं जीवन. नवी बंधनं.

☆ ☆

बोलता बोलता आज मी सहज तुझ्या छोट्याचे गाल कुस्करले. त्याला जवळ घेतला. त्याचा गोड गोड पापा घेतला. अन् विचारले,

"काय रे लब्बाडा, नांव काय तुझं?"

"नांव सांग कीं रे–" तू तुझ्या मुलाला म्हटलीस; नि मग स्वतःच बोबड्या आवाजात म्हणालीस, "म्हणावं माझं नांव किनई सुनिल."

"सुनिल?–" मी पुटपुटलो. मला कसली तरी आठवण झाली. मी खुदकन् हंसलो. तुझ्या ते लक्षात आलं. मग तूहि हसलीस. जराशी लाजलीसदेखील.

अन् मग तू माझ्या मुलीचे लाड केलेस. तिला जवळ घेतलेस. तिला वर उचलंस. तिचा पापा घेतलास. तिला लॉलीपाप देण्याचा सुनीलला हुकूम केलास. तिचे भराभर मुके घेतलेस. अन् मग मला विचारलेस,

"काय नांव ठेवलं रे हिचं"?

"अजिता"–मी म्हणालो.

"अ–जि–ता–" तू पुटपुटलीस. तुला देखील कसलीतरी आठवण झाली असावी. तू खुदकन् हसलीस. मी देखील हंसलो. तू मग आपले गाल अजिताच्या गालाशी अधिकच घासू लागलीस.

आपलं गुपित कुणालाच कळणार नव्हतं. तुझ्या नवऱ्याला नि माझ्या बायकोला पण ! खुळ्यासारखे ते आपल्याकडे पहातच राहिले.

☆ ☆

हेहि आपलं एक स्वप्न होतं.

या स्वप्नाची आपण कितीदां तरी उजळणी केली. पारायणं केली.

कधी बागेतल्या एखाद्या आडोशात तर कधी ओल्या गवताच्या मऊ हिरव्या बिछायतीवर लोळत असता....

कधी अंधारात तर कधी धूसर पहाटे..

आपण बेत करायचो.

आपल्याला जर पहिला मुलगा झाला तर त्याचं नांव सुनिल ठेवायचं. ते माझ्या आवडीचं नांव होतं.

अन् आपल्याला मुलगी झाली तर तिचं नांव अजिता ठेवायचं. हे तुझ्या पसंतीचं नांव.

☆ ☆

अगदी पूर्ण शुद्धीत असता, जागेपणी, कसलीहि धुंदी नसताना, (माझ्या बाबतीत नशापाणी न करता) आपली किमान स्वप्नं ही होती—

आपल्याला एक छोटंस का होईना पण स्वतःचं स्वतंत्र घर हवं होतं.

(डबलरूम मिळाल्यास उत्तमच !)

आपल्याला कमीत कमी (अन् जास्तीत जास्तहि) तीन ते चार मुलं हवी होती. (जास्त नकोत म्हणून तू वेळोवेळी माझ्या दंडाला चिमटे घेऊन कडक सुचना द्यायचीस) पैकी दोघांची नांवे अनुक्रमे सुनिल नि अजिता.

मी ऑफिसातून येतो. तू माझी वाटच पहात असतेस. मग तू मला चहा, शिरा देतेस. नंतर आपण फिरायला जातो. बाजार करतो. इ. इ.

अनर्थसंकल्प : १

घेराव !

कधी मधी सिनेमा, नाटक.....

दर महिन्याला पैसे शिल्लक टाकून एखादी नवी वस्तू खरेदी करायची. घर खूप खूप छान सजवायचं. एकं गोदरेजचे कपाट. एक रेडिओ...डवलरुम मिळाल्यास सोफा सेट...चार फोल्डिंगच्या स्टीलच्या खुर्च्या. एखादा टीपॉय नि एक पलंग. स्टेनलेसस्टीलची भांडी इत्यादि, इत्यादि.

☆ ☆

आपलं लग्न झालं नाही. जाऊ दे. शेवटी नशिबातच नव्हतं असं समजायचं. परमेश्वराने अगोदरच ज्याच्या त्याच्या गांठी मारून ठेवलेल्या असतात.

जीवनात कधी ना कधी, केव्हा ना केव्हा हार खावीच लागते. तडजोड करावी लागते. ती आपण केली. बऱ्याचशा सुज्ञपणे. समंजसपणे.

तू सुखी आहेस.

मी सुखी आहे.

परमेश्वरकृपेने आपलं सर्व काही ठीक आहे.

आपली बहुतेक स्वप्नं पुरी झाली आहेत. बाकीची पुढे होतील. (अपवाद फक्त आपल्या मीलनाचा) तुला सुनील आहे. मला अजिता आहे.

तुला अजिता होईल. मला सुनील.

एकूण काय तर भिडू फक्त बदलला. बाकी डाव मात्र तोच आहे.

☆ ☆

तात्पर्य: आपल्या प्रीतीला वियोगाचा शाप होता. पण शापातहि वरदानाची बीजं असतातच. नाही का?

☆ ☆

कितीतरी वर्षांनी आज–होय–आजच एका गोष्टीची जाणीव झाली. काही तासांपूर्वी......झोपताना.....मनाच्या मंथनातून कितीतरी आठवणी आज बाहेर आल्या. शरीरातला, मनातला कण न् कण पाकळी बनला. उमलून आला. फुलून आला. प्रफुल्ल झाला. उत्फुल्ल झाला.

अन् शेवटी तो अमृतमय गंध आठवला. अमृतानं भरलेला.

झोपतेवेळी मी हिला खसकन् माझ्याजवळ ओढलं. तिच्या केसात नाक खुपसलं. तिला मिठीत घेतलं. कुस्करलं. तिच्या उघडया वक्षस्थळात तोंड घुसळलं. अन् फुरफुरणाऱ्या बाहूंचा विळखा घट्ट होताना तिच्या शरीराचा सुगंध मी नाकाने जोराने ओढून घेतला; माझ्या हृदयात, प्राणात सांठवून ठेवला. कितीतरी वेळ.....

तो गंध अगदी तसाच होता. अगदी तसाच.... जसा तुझ्या शरीराला यायचा. एखाद्या रसरशीत पक्व आम्रफलासारखा. ज्या गंधाने मी वेडापिसा व्हायचो. धुंद व्हायचो. जो गंध माझ्या श्वासाला सुगंधित करायचा. माझ्या रोमरोमात भिनायचा. देहातला अणूरेणू उत्तेजित करायचा मेंदूला मदिरा पाजून बेहोष करायचा.

☆ ☆

धुंद मदिर निशेला जाग आली आहे. दोन्ही हातांची बोटं परस्परात मानेमागे गुंतवून ती आपल्या शरीराला आळोखेपिळोखे देत आहे. आळसावलेल्या नजरेने ती आपल्या शरीरावरचे चांदण्यांचे दंतव्रण पहाते, नि मग लगबगीने ते दडवते. स्वतःशीच ती खुदकन् हसते. लाजलाज लाजते. हातांच्या ओंजळीत आपला चेहरा लपवते.

(पृष्ठ २४ वर)

दाहक तरीहि गोड, हवीहवीशी वाटणारी वेदना. तडफड. हुरहूर.

शरीराच्या कणाकणातून अंगार उसळवणारा तो दाहक स्पर्श.

परस्परांना दिलेली वचनं. केलेले वायदे........

घेतलेल्या आणाभाका. शपथा.

तू मला म्हटली होतीस, मक्या, तुझ्याशिवाय मी जगू शकणार नाही.

मी तुला म्हटलो होतो, तुझं जर दुसऱ्याशीं लग्न झालं तर मी जीवच देईन.

पण. . . . .

पण अखेरीस तुझं लग्न झालं. दुसऱ्याशी.

अन् मग अनेक रात्री आपल्या उशा अश्रुसिंचनाने भिजल्या.

सशाच्या वेगाने दौडणाऱ्या काळाने जखमी हृदयाला मलमपट्टी केली.

रडू येत होतं. पण रडलो नाही. ओरडावेसं वाटत होतं. पण ओरडलो नाही.

वेदना होत होत्या. पण त्या वेदनांतून आपला नवा जन्म होत होता.

अखेर काही दिवसानी माझ्याहि लग्नाचा बँडबाजा वाजला.

तुझ्यात नि माझ्यात किती मोठं अंतर पडलं.

शारीरिक. मानसिक. नैतिक. भौगोलिक अन् काळाचेहि.

अखेरीस आपण दोघेहि सुखरूप राहिलो. जिवंत राहिलो.

मरायला तू काही लैला नव्हतीस, कीं मी मजनू नव्हतो.

आज हे सारं सारं आठवलं. मला. अन् कदाचित् तुलादेखील.

आज त्या देशाची, त्या स्वप्नभूमीची आठवण झाली.

तो देश कधीच भूकंपात जमीनदोस्त झाला. जमिनीत खोलवर गाडला गेला.

आता कधीतरी आठवलाच तर आपला हा मूर्खपणा. प्रेमात पडण्याचा.

आता नवं जीवन. नवी बंधनं. ☆ ☆

बोलता बोलता आज मी सहज तुझ्या छोटयाचे गाल कुस्करले. त्याला जवळ घेतला. त्याचा गोड गोड पापा घेतला. अन् विचारले,

"काय रे लब्बाडा, नांव काय तुझं?"

"नांव सांग कीं रे–" तू तुझ्या मुलाला म्हटलीस; नि मग स्वतःच बोबड्या आवाजात म्हणालीस, "म्हणावं माझं नांव किनई सुनिल."

"सुनिल?–" मी पुटपुटलो. मला कसली तरी आठवण झाली. मी खुदकन् हंसलो. तुझ्या ते लक्षात आलं. मग तूहि हसलीस. जराशी लाजलीसदेखील.

अन् मग तू माझ्या मुलीचे लाड केलेस. तिला जवळ घेतलेस. तिला वर उचलंस. तिचा पापा घेतलास. तिला लॉलीपाप देण्याचा सुनीलला हुकूम केलास. तिचे भराभर मुके घेतलेस. अन् मग मला विचारलेस,

"काय नांव ठेवलं रे हिचं"?

"अजिता"–मी म्हणालो.

"अ–जि–ता–" तू पुटपुटलीस. तुला देखील कसलीतरी आठवण झाली असावी. तू खुदकन् हसलीस. मी देखील हंसलो. तू मग आपले गाल अजिताच्या गालाशी अधिकच घासू लागलीस.

आपलं गुपित कुणालाच कळणार नव्हतं. तुझ्या नवऱ्याला नि माझ्या बायकोला पण! खुळ्यासारखे ते आपल्याकडे पहातच राहिले.

☆ ☆

हेहि आपलं एक स्वप्न होतं.

या स्वप्नाची आपण कितीदां तरी उजळणी केली. पारायणं केली.

कधी बागेतल्या एखाद्या आडोशात तर कधी ओल्या गवताच्या मऊ हिरव्या बिछायतीवर लोळत असता....

कधी अंधारात तर कधी धूसर पहाटे..

आपण बेत करायचो.

आपल्याला जर पहिला मुलगा झाला तर त्याचं नांव सुनिल ठेवायचं. ते माझ्या आवडीचं नांव होतं.

अन् आपल्याला मुलगी झाली तर तिचं नांव अजिता ठेवायचं. हे तुझ्या पसंतीचं नांव.

☆ ☆

अगदी पूर्ण शुद्धीत असता, जागेपणी, कसलीहि धुंदी नसताना, (माझ्या बाबतीत नशापाणी न करता) आपली किमान स्वप्नं ही होती—

आपल्याला एक छोटंस का होईना पण स्वतःचं स्वतंत्र घर हवं होतं.

(डबलरूम मिळाल्यास उत्तमच!)

आपल्याला कमीत कमी (अन् जास्तीत जास्तहि) तीन ते चार मुलं हवी होती. (जास्त नकोत म्हणून तू वेळोवेळी माझ्या दंडाला चिमटे घेऊन कडक सुचना द्यायचीस) पैकी दोघांची नांवे अनुक्रमे सुनिल नि अजिता.

मी ऑफिसातून येतो. तू माझी वाटच पहात असतेस. मग तू मला चहा, शिरा देतेस. नंतर आपण फिरायला जातो. बाजार करतो. इ. इ.

**अनर्थसंकल्प : १**

**घेराव !**

कधी मधी सिनेमा, नाटक.....

दर महिन्याला पैसे शिल्लक टाकून एखादी नवी वस्तू खरेदी करायची. घर खूप खूप छान सजवायचं. एक गोदरेजचे कपाट. एक रेडिओ...डबलरूम मिळाल्यास सोफा सेट...चार फोल्डिंगच्या स्टीलच्या खुर्च्या. एखादा टीपॉय नि एक पलंग. स्टेनलेसस्टीलची भांडी इत्यादि, इत्यादि.

☆ ☆

आपलं लग्न झालं नाही. जाऊ दे. शेवटी नशिबातच नव्हतं असं समजायचं. परमेश्वराने अगोदरच ज्याच्या त्याच्या गांठी मारून ठेवलेल्या असतात.

जीवनात कधी ना कधी, केव्हा ना केव्हा हार खावीच लागते. तडजोड करावी लागते. ती आपण केली. बऱ्याचशा सुज्ञपणे. समंजसपणे.

तू सुखी आहेस.

मी सुखी आहे.

परमेश्वरकृपेने आपलं सर्व काही ठीक आहे.

आपली बहुतेक स्वप्नं पुरी झाली आहेत. बाकीची पुढे होतील. (अपवाद फक्त आपल्या मीलनाचा) तुला सुनील आहे. मला अजिता आहे.

तुला अजिता होईल. मला सुनील.

एकूण काय तर भिडू फक्त बदलला. बाकी डाव मात्र तोच आहे.

☆ ☆

तात्पर्य: आपल्या प्रीतीला वियोगाचा शाप होता. पण शापातहि वरदानाची बीजं असतातच. नाही का?

☆ ☆

कितीतरी वर्षांनी आज—होय—आजच एका गोष्टीची जाणीव झाली. काही तासांपूर्वी......झोपताना.....मनाच्या मंथनातून कितीतरी आठवणी आज बाहेर आल्या. शरीरातला, मनातला कण न् कण पाकळी बनला. उमलून आला. फुलून आला. प्रफुल्ल झाला. उत्फुल्ल झाला.

अन् शेवटी तो अमृतमय गंध आठवला. अमृतानं भरलेला.

झोपतेवेळी मी हिला खसकन् माझ्याजवळ ओढलं. तिच्या केसात नाक खुपसलं. तिला मिठीत घेतलं. कुस्करलं. तिच्या उघडया वक्षस्थळात तोंड घुसळलं. अन् फुरफुरणाऱ्या बाहूंचा विळखा घट्ट होताना तिच्या शरीराचा सुगंध मी नाकाने जोराने ओढून घेतला; माझ्या हृदयात, प्राणात सांठवून ठेवला. कितीतरी वेळ.....

तो गंध अगदी तसाच होता. अगदी तसाच....जसा तुझ्या शरीराला यायचा. एखाद्या रसरशीत पक्व आम्रफलासारखा. ज्या गंधाने मी वेडापिसा व्हायचो. धुंद व्हायचो. जो गंध माझ्या श्वासाला सुगंधित करायचा. माझ्या रोमरोमात भिनायचा. देहातला अणूरेणू उत्तेजित करायचा मेंदूला मदिरा पाजून बेहोष करायचा.

☆ ☆

धुंद मदिर निशेला जाग आली आहे. दोन्ही हातांची बोटं परस्परात मानेमागे गुंतवून ती आपल्या शरीराला आळोखेपिळोखे देत आहे. आळसावलेल्या नजरेने ती आपल्या शरीरावरचे चांदण्यांचे दंतव्रण पहाते, नि मग लगबगीने ते दडवते. स्वतःशीच ती खुदकन् हसते. लाजलाज लाजते. हातांच्या ओंजळीत आपला चेहरा लपवते.

(पृष्ठ २४ वर)

# प्राचीन काव्यातील कौटुंबिक जीवन

**देवाची मी अशी गडे, लेकरु घेऊनिया कडे।**
**प्रीतीने उभी पतिपुढे, जन्मे जुग नांवा चढे।**

—प्रा. वि. म. कुलकर्णी

**मराठी** काव्यक्षेत्रातील कुटुंब-जीवनाविषयीच्या कविता पाहू गेल्यास मन हरखून जाते. लहानमोठ्या, जुन्यानव्या सर्व कवींनी मोठ्या रसिकतेने व चातुर्याने कुटुंबजीवनाबद्दलच्या आपल्या विविध अनुभूति काव्यात ग्रथित केल्या आहेत. कौटुंबिक जिव्हाळ्याने भारलेल्या लहानसहान हृद्य क्षणांनी मराठी कवितेला कितीतरी खाद्य पुरविले आहे. त्यांची गोडी अवीट आणि अक्षय आहे.

प्राचीन काव्यांपैकी स्त्रीगीतांतील अनेक ओव्यात तर कुटुंब-जीवन ओतप्रोत भरून राहिले आहे. जीवितातील कडू-गोड प्रसंग तेथे किती तन्मयतेने चित्रिलेले आहेत ! सारे स्त्रीजीवन म्हणजे–जुन्या काळी तरी, कुटुंबजीवनाच्या उभ्याआडव्या धाग्यांनी गुंफलेला एक पटच होता. स्त्रीजीवनाच्या द्वारे, त्या ओव्यातून, साऱ्याच गृहजीवनाचे चित्र पुढे उभे राहते. शिवाय त्यात सहज-स्फूर्ति आहे, अकृत्रिम जीवनप्रीति आहे. खेड्यापाड्यातील माय-माउल्यांनी ही गीते आपल्या अस्सल मराठी बोलीत लिहिलेली आहेत. त्यातील जिव्हाळ्याचा अस्सलपणाही रसिकाना चटकन् पटावा.

—या स्त्रीला साऱ्याच जीवनाची ओढ फार. त्यातहि माहे-राची ओढ विशेष. सासरी मन आकंठ रमले, तरी जीविताच्या अखेरीपर्यंत माहेर त्याला सोडीतच नाही ! माहेराचा तो आनंद काय वर्णावा! आईवडिलांच्या, भावाच्या भेटीसाठी माहेरी जाऊन आलेली 'सई' कंथाला म्हणजे पतीला म्हणते—

> कंथ पुशित्यात । रानी, माहेरवास कसा?
> केळीच्या पानावर । आंबेमोहोराचा भात जसा!
> माह्यार माझं केलं । बंधु माझ्या हंबीरानं
> समदी पाठ झाकीयली । जरीच्या पदरानं!

मातेचे प्रेम तर सईला संसारात घडीघडी आठवत असते. तिला न्हायला बसताना आठवण होते—आपले केस इतके लांब कां?–तर त्याना आईने कोंकणच्या शिकेकाईची 'संवय' लावली आहे......

> लांब लांब केस । त्या केसाचं नवल काई
> कोकनची शिककाई । सव लावली, बयाबाई!

आईच्या माघारी मात्र ते माहेर दुरावते. मन खंतावते. 'सई' आपल्या वेड्या मनाला म्हणते:

> आईबापाच्या माघारीं । भाऊ नव्हत बहिनीचं
> बहीन इसरती । करता माह्यार मेव्हणीचं ।।
> जाते माह्याराला । भावजय करी रागराग
> माय ती न्हाई आता । वेड्या मना, फिर मागं!

अनुक्रमणिका

—हे झाले माहेराविषयी. पण आपल्या स्त्री–गीतात सासरविषयी आणि लेकीविषयी कितीतरी रसाळ ओव्या आढळतात. महाराष्ट्राच्या कौटुंबिक जीवनाचे, कित्येक शतके चालत आलेले खरेखुरे रमणीय चित्र पहात्रयाचे तर ते या ओव्यातच पहावे. दुःखाचे कंगोरे झडून त्यालाही सुखाची चव यावी–या 'सांसारिक चमत्काराचे' दर्शन येथेच घडते! 'सई' आपले सुखदुःख मोकळेपणाने सांगते. पती जसा प्रेमळ तसाच तापट आहे. माझा घरधनी म्हणजे, पिकल्या पानाच्या विड्यासारखा सरकार-दरबारी शोभणारा मानाचा मऱ्हाठा आहे, हे सांगता सांगताच त्याचा धाक किती वाटतो, तेहि मजेने बोलून दाखविले आहे:

भरताराचा राग । डाव्या डोळयाची तराटणी
माझ्या वहिणाई । नग बोलूस मराठणी !

—त्या जुन्या काळी, जनपदातील त्या जीवनात सुबत्ता नांदत होती. कष्टाच्या कृषीजीवनातही घरभरला आनंद होता. पतिपत्नीचे प्रेम मर्यादेने पण उत्कटतेने भरलेले होते. भ्रताराविषयींचा आदर, त्याच्या रूपाचा गौरव, त्याच्या जीवावर चाललेला संसाराचा सुखी डाव 'सईने' फार सुरेख वर्णिला आहे. ते खरे कौटुंबिक जीवन होते. जिव्हाळयाने जगणारे—कृष्णा-गोदेच्या पाण्यासारखे, पायरीला लडिवाळ झटणारे, पायाला लाडिकपणे भेटणारे.

सई पतीविषयी म्हणत आहे—

टिपूर चांदनं । चांदन्याजोगी रात
शेजेच्या भरताराची । देवासारखी सोवत
उन्हाळा पावसाळा । पानमळयाचा गारवा
हौशाच्या जीवावरी । नाही कुनाची परवा
भरताराचं राज । जसा ओटीतला मेवा
पोटीच्या बाळाला । हिशेब किती द्यावा!

यातल्या उपमा, यातल्या प्रतिमा खास मराठी आहेत. त्यातून ओसंडणारे भावविश्व शब्दात उलगडून दाखविणे मोठेच कठीण!

पोटीच्या बाळाला पतीच्या राज्याचा हिशेब देऊ पाहणारी ही मराठी स्त्री, आपल्या घरात दुडुदुडु धावणाऱ्या बाळाच्या लीलात पुरती रंगून गेली आहे असे दिसते. त्या वंशवेलीच्या नवांकुराला ती किती गोडीने, किती अपूर्वाईने जपते आहे, किती आशेने जोपासते आहे, ते पाहण्याजोगे आहे. देखण्या तान्हुल्याला ती किती नांवाजते. त्याला ती चंद्र म्हणते, निशिगंध म्हणते, सोन्यामोत्याचा खिचडा म्हणते, कडेवरचा लाल म्हणते, साखरेचा बत्तासा म्हणते ! कुटुंबातल्या सुखदुःखाच्या कावडी सहज सहज वाहताना मराठा स्त्रीने आधाराला नेहमी 'तान्ह्या श्रीरंगाचे' बोट धरले आहे ! तालेवार स्त्रियांना, ताठपणाने, ती, आपले लेकरू हाच आयना म्हणजे आरसा अभिमानाने दाखवीत आहे:

धनसंपदेची नार । मला जातीया खेटून
नेणन्ता बाळ माझा । आयना दाविते उठून !

संसार वाढत चालला तसे बाळाचे व लेकीचेही कौतुक होऊ लागले. लेक आणि लेकी हे संसारमांडवावर चढणाऱ्या वेलीचे कोवळे तणावे! त्यांच्या जीवावर आता आणि पुढेही राज्य भोगायचे. आपले मन मुलात गुंगते आणि मुलीत गुंगत नाही असे थोडेच आहे? एका कुशीचीच ती दोन्ही 'रत्ने' आहेत. दोन्हीचे तेज वेगळे. रूप वेगळे. पण आईला ती सारखीच. उलट, खास मायेचा, मरणापावेतोचा खजिना म्हणजे मुलगी. म्हणून 'लोटीशेजारी वाटीची हौस', लेक हा वाड्याचा कळस तर लेक ही दारींची तुळस. तिचे सोहाळे करताना आई पुनः आपले मागले जीवन जगते. लेकीच्या रूपाने आईला इहलोकीचे दोन जन्म मिळतात. इतकेच काय, इहलोक संपल्यानंतरही लेकच आईची ओवी गाते. म्हटले आहे—

लेकापरायास, लेक । कशानं उणी झाली
आईबापाला ओवी गाते । कैलासी ऐकू गेली !

अशा ह्या कुटुंबजीवनात 'पाहुणा' म्हणून कोणी येणे हा आनंदाचा क्षण तेव्हा होता ! रुमाल गुंडाळून मोठ्या 'झाकीत' आलेल्या या पाहुण्याचे गोड स्वागत होत होते. त्याच्या भोजनासाठी काय विशेष करावे....

...घरला पावना । कोंबडा किशीते
मामा सख्याच्या भोजनाला । माझा भोयाला पुशिते

असे हौसेने म्हणणारी सई त्याला आग्रह करकरून वाढते, पण दुसराही एखादा पाहुणा येतो. त्याचा हात मागे सारून त्याला आग्रह कसा करावा? कारण–

घरला पावना । जेव म्हणता जेवीना
त्याच्या हाताला कशी धरू । बन्धु नव्हं, तो मेव्हणा !

या ओवीतील सूक्ष्म व्यंजनेची झुळूक रसिकांच्या सहजीच लक्षात राहील !

जुन्या काव्यातील कौटुंबिक जीवनातले हे काही हृद्य क्षण होत. सईचा संसार एकूण गोडीचा होतो हे तर खरेच, पण तिची, सौभाग्य असताना मरणाविषयीची कल्पनाही सामान्य नाही. संसाराप्रमाणे मरणालाही जिंकण्याची तिची ती आशा कशी उदात्तपणाने व्यक्त झाली आहे पहा–

अहेव मरणाची । मजला आहे गोडी
माय मावशी माझी । देवसभेला फुलं तोडी ।।
अहेव मरणाचा । नगारा ठोकीला
माय माझ्या मावशीनं । डाव गिरजानं जिंकीला

...प्राचीन संतकवी हे बोलून चालून परमेश्वराच्या चिंतनात रमलेले. त्यांनी आपल्या कवितेत संसारातल्या रमणीयतेचे फार असोशीने वर्णन केलेली दिसत नाहीत. पण तेही हाडाचे प्रतिभावंत असल्याने दृष्टांतासाठी का होईना, जेव्हा जाता जाता एखादा संसार–जीवनाचा धागा सहज हातात घेतात तेव्हा तोही सुवर्णाचा होऊन झळाळत राहतो. बाळ बापाच्या ताटात जेवत






आहे त्याचे, किंवा तो प्रथम चालूबोलू लागतो त्याचे संसार-जीवनात किती वेगळे कौतुक असते, हे श्री ज्ञानेश्वरांनी किती सहज सांगितले आहे ! संतांकडे कृपेची याचना करताना ते म्हणतात—

वालक वापांच्या ताटीं रिंगे।
आणि वापाते जेववू लागे।
कीं तो संतोषलेनि वेगें। मुखचि ओढवी।।

बापाला घास भरवून (लहानपणी तरी) 'संतोष' देणारा हा बाळ जसा सदैव आपल्या लक्षात राहतो, तसाच तो—बोवडे बोलणारा व आईला आनंदविणारा दुसरा बाळही आपण विसरू शकत नाहीं :

नातरी बालक बोवडा बोली।
वांकुडा विचुका पाउलीं।
तें चीज करुनि माउली। रिझे जेवी।।

याचप्रमाणे, आवडत्या माणसाच्या रागाने देखील प्रेम वाढतच जाते हे नवलाईचे सत्य, "तान्हयाचे लागता झटे। तेणे अधिकच पान्हा फुटे" या रसाळ ओवीत सांगितलेले आहे. अशा काही रसार्द्र ओव्या वाचताना वाटते कीं, कुटुंबीय जीवनाचे मर्म व स्वारस्य निवृत्तिमार्गी संतांना जेवढे कळले तेवढे सामान्य सांसारिकांना तरी कळले असेल काय ?

संत तुकारामांच्या कवितेत तर कुटुंबजीवनातले दृष्टांत व मजेदार प्रसंग आणि मार्मिक घटना यांचे चित्रण वारंवार आढळते:




सोईऱ्याचा भला पाहुणचार करणारे हे, कुटुंबीजन संतांना मात्र दंडुका दाखवितात याचे तुकारामाना नवल वाटते! ते म्हणतात—

वाइलेच्या गोता। आवडीने पोसी
मातापितयासी। दवडीतो
उरा लावी ऊर। आळंगिता कान्ता
संतांसी भेटतां। अंग चोरी

सांसारिकांची ही कांता त्याला ज्या गुजगोष्टी सांगत आहे त्यात—जुन्या काळच्या एकत्र कुटुंबपद्धतीला कंटाळलेली व नवऱ्याला, सत्वर वेगळे निघण्याची घाई करणारी हुशार स्त्रीही आपणास दिसून येते. "तुम्ही मिळविता आणि सारे खातात" ही सनातन तक्रार येथे आहे, त्याचप्रमाणे पति आपला अंकित आहे याची सूक्ष्म जाणीवही आहे, ती मोठी लक्षणीय आहे:

भ्रतारासी भार्या बोले गुजगोष्टी। मज ऐसी कष्टी, नाही दुजी
जोडितसां तुम्ही खाती येर चोरें। माझी तंव पोरें हळहळती...
ठाकते ठुमकते जीव मुठी धरनी। परी तुम्ही अजुनी न धरा राग
वेगळे निघता संसार करीन। नाहीतरी प्राण देते आतां !

संसारातले पैशाचे महत्वहीं तुकाराम चांगले वर्णितात;

धनवन्तालागी। सर्व मान्यता हे जगी
मातापिता बंधुजन। सर्व मानिती वचन
जंव चाले मोठा धंदा। तंव बहीण म्हणते दादा
सहा शृंगार भूषणें। कांता लवे बहुमाने

इत्यादी वचनांतील भावार्थ अगदी सत्यच आहे. स्वतः तुकारामांचे व त्यांच्या पत्नीचे कौटुंबिक जीवनाच्या अनुषंगाने झालेले वादसंवाद जितके काव्यमय तितकेच ध्येयवादी पती व व्यावहारिक पत्नी यांची नेहमीची ओढाताण दर्शविणारेच आहेत.

संतांनी वर्णिलेल्या श्रीकृष्णाच्या बाललीला व त्यांनी लिहिलेल्या शेकडो गौळणी वाचीत असताना कुटुंबजीवनातील रहस्ये व मर्मस्थळे संतांनी दुरून तरी चांगली न्याहाळिली होती, असे वाटू लागते...

कृष्णाचे बाळरूप व वाकी-वाळे आणि सांखळ्या घातलेले त्याचे ध्यान आणि नंदाघरच्या त्याच्या खोड्या तुकाराम-नामदेवादिकांनी मोठ्या सरसतेने रंगविल्या आहेत. 'कुल्ला थमाल ले थमाल अपुल्या गाई।' असे म्हणणाऱ्या कृष्णाच्या सवंगड्याचे नर्मविनोदाने नटलेले व्यक्तिचित्रही संतवाङ्मयातील कौटुंबिकपणा दर्शविणारेच म्हणावे.

संतकवींकडून पंडितकवींकडे वळले तर थोडा निराळा देखावा दिसतो. हे पंडितकवी सामान्यतः सांसारिकच होते. त्यामुळे आख्याने गातानाही मधूनमधून कुटुंबजीवनाची प्रत्यक्षाप्रत्यक्ष वर्णने ते करतातच. किंबहुना कृष्णरुक्मिणीच्या किंवा रामसीतेच्या कथांच्या पडद्याआडून त्यांनी कुटुंबवत्सलतेचे व कुटुंबातील प्रेममयी लीलांचे दर्शन घडविलेच आहे. "चारी पुत्राहुनी वेगळी। वाढविली हे वेल्हाळी। आतां दिधली तुम्हाजवळी।






सांभाळ कीजे ।।" या 'रुक्मिणी–स्वयंवरातील' एकनाथांच्या ओंवीत एक कुटुंबवत्सल पिताच रुक्मिणीच्या पित्याच्या रूपाने उभा राहिलेला दिसतो. सामराजाच्या "रुक्मिणी-हरणात" कृष्णविवाहाच्या वेळच्या गोड धांदलीचें जे वर्णन आहे ते कोठल्याही कुटुंबात आजही पहावयास मिळणारेच आहे. तळण तळतानाच्या वेळचे वर्णन सामराज पुढीलप्रमाणे विनोदी पद्धतीने करितो:

बसेति तेथें तळणें तळाया । तें अर्भकें धावति आतळाया ।

वाजेति तेथें धबके करांचे । आकांत होती बहु लेकरांचे!

प्राचीन शाहीरांचे काव्य म्हणजे जुन्या काव्यातील शेवटचा टप्पा. त्यांचे अस्सल मराठमोळा काव्य वाचल्यास त्यातही कौटुंबिक जीवनाचा मजेदार आलेख अनेक वेळा आढळून येतो. शाहीरांच्या लावण्यांमध्ये केवळ शृंगारच आहे असे नाही. तेथें प्रेमळ विरहिणी व झुरणाऱ्या सुंदरा आहेत, त्याचप्रमाणे पतिव्रता आहेत, गर्भवती आणि लेकुरवाळयाही आहेत. तेथे सवतींचे मौजेचे भांडण आहे, तसेच "जमाना आला उफराटा । सून सासूला लावी बट्टा" हे वस्तुस्थितिनिदर्शक गीतही आहे. कलीचा वारा लागल्यामुळे–"जावई सासूला म्हणतो, तूं काशी । लवंडून देतो मातेशी ।।" असे उफराटे कसे घडते, याचे अनंतफंदी यानी फार सुरेख वर्णन केले आहे. याचप्रमाणे, सात्विक वृत्तीच्या कुटुंबिनीचे चित्रही मोठे मनोहर उतरलेले कोठे–कोठे आढळून येते. तिला कवीने–'निर्मळ गंगेचे नीर' किंवा 'मध्यम मंजुळ समीर' असे गौरविले आहे. अशा स्त्रीची, स्वारीवर निघालेल्या पतीला घरी राहण्याबद्दलची विनंती प्रभाकर शाहीराने उत्तम प्रकारे शब्दांकित केली आहे. ती स्त्री म्हणते—

नका जाऊ दूर देशी, घरीं काय धनद्रव्याला कमी ।

आली हो वर्षाची नागपंचमी ।।
साजुक नाजुक पदार्थ केले शर्करेंत भरभरून
पाक पाजविला सगळयावरुन
तळुन मळुन वोटवे वळून वाढीते पदर सांवरून
चंद्र न्याहाळिन मी तुमचा दुरुन...
खडिसाखर मिसळे दुधीं । तशी प्रीत तुझी गुणनिधि ।।

—पण, पतीने मोठ्या कौशल्यानेच तिची समजूत काढली व तो लढाईवर गेला. त्याने तिची स्तुति केली कीं, "अमृतवेळा पाहुन ब्रह्मदेवाने मूर्त घडली । फिरत फिरत चौऱ्यांशी,–गांठ वरि मानवात पडली ।।"

असे हे प्राचीन काव्यातले कौटुंबिक जीवन. त्यातले बहुविध क्षण प्रेम, त्याग, माया आणि जीवननिष्ठा या गुणांनी नटलेले आहेत. परशराम कवीने एका निपुत्रिकेचे वर्णन केले आहे. सर्वांगी नेत्र आहेत पण पाय मात्र कुरूप आहेत म्हणून मोराप्रमाणे झुरणाऱ्या त्या स्त्रीला महाराष्ट्राचा दयाळू देव पंढरीनाथ शेवटी पावला; व घरात पुत्रजन्माचा आनंद झाला. हे सांगून कवीने तिच्या तोंडी पुढील शब्द घातले आहेत.

—दैवाची अशी मी गडे
लेकरू घेऊनिया कडे
प्रीतीने उभी पतीपुढे
जन्मे जुग नांवा चढे!

लेकरू कडेवर घेऊन पतीपुढे प्रेमाने उभी राहणारी व देवाच्या नांवाचा आठव करणारी ही माता म्हणजे प्राचीन काव्यातील कुटुंबजीवनाच्या उदात्त रमणीयतेची एक प्रतीकच नव्हे काय?

●●●



**....प्रयत्नानं गेली वीस वर्षे सांवरून धरले. त्यांच्या मनाचं वारू आज त्यांच्या इच्छे-विरुद्ध बेलगाम उधळण्याचा प्रयत्न करू लागलं. आंसवानी भरलेल्या डोळ्याना विठ्ठलाची मूर्ति दिसेनाशी झाली. प्रयत्नानं दूर सारून सुद्धा गेली वीस वर्षे त्यांच्या डोळ्यापुढे एकाद्या नाटाळासारखी पिंगा घालू लागली....**

# मुक्ति

भास्कर उत्तरवार



"**बापू** तुम्हाला मुलगा झाला जी!"

म्हाताऱ्या गंगा सुईणीनं मोठ्या आनंदानं बातमी दिली पण ज्ञानेश्वरी वाचण्यात रंगून गेलेल्या माधवरावाना त्याची जाणीव झाली नाही.

पार्वतीबाईंना प्रसूतीवेदना सुरू झाल्या आणि त्यानी ज्ञानेश्वरीची पोथी काढून वरची चिरपरिचित सुरगाठ सोडून अठरावा अध्याय निर्विकार मनाने वाचायला सुरुवात केली होती. गेल्या चार खेपेला त्यानी हेच केलं होतं. पत्नीनं वेदनांनी कण्हणं सुरू करावं आणि त्यांनी ज्ञानेश्वरीचा अध्याय वाचीत बसावं हे आता एवढं निश्चित झालं होतं की गंगा सुईणीला माधवरावांनी प्रतिसाद दिला नाही म्हणून प्रथम नवल वाटलं नाही.

पण आजची वेळ तिला नवलाचीच होती. आनंदाची होती. पार्वतीबाईंची गेली सात बाळंतपणं तिनं केली होती. आणि सातहि वेळी मुलगी झाल्याची बातमी तिनंच माधवरावांना दिली होती. आपले शब्द ऐकून माधवरावांच्या चेहऱ्यादर काहीच बदल होत नाही ते तिला एव्हाना चांगलं कळून चुकलं होतं. प्रत्येक वेळी मुलगी झालेली बघावी आणि माधवरावांनी ते गृहित धरून तिकडे लक्ष न देता ज्ञानेश्वरी वाचीतच रहावं हे सूर्य उगवण्याइतकंच तिच्या दृष्टीत निश्चित झालं होत.

पण आज ती आनंदानं उन्मळून आली होती. वाड्याला वारस झाल्याची आनंददायक वार्ता मालकांच्या कानी सर्वप्रथम घालायला तिचा जीव उन्मळून आला होता.

माधवराव शांतपणे वाचीत होते,

**आता करणे का न करणे। हे जेणे**
**उठी दुजेपणें।**
**ते तू वाचूनि नेणे। सर्वत्र गा॥**
**ये विषयी माझ्या ठायी। संदेहाचे नुरे काही**
**त्रिशुद्धि कर्म जेथ नाही। ते मी झालो॥**

आवाजात क्षणमात्र कंप नाही, दृष्टि करुणपूर्ण झालेली आणि अंतःकरणाची लय लागलेली.

त्यांची ती समाधिमय स्थिति बघून,

गंगाला भडभडून आलं. तिच्या अडाणी नजरेत देवासमान असणाऱ्या त्या महात्म्याची समाधि तिला भंगवाविशी वाटली नाही. ती तशीच हिरमुसून परतली.

समोरच्या विठ्ठलाच्या मूर्तीशी माधवरावांची एकात्मता साधली होती. मंदपणानं जळणाऱ्या उदबत्तीचा सुगंधी धूर वळणं घेत त्यांच्या शब्दात मिसळून तन्मयता निर्माण करीत होता.

त्या तन्मयतेनं भारलेल्या त्यांनी क्षणभर वाचन थांबवलं आणि अचल दृष्टीनं विठ्ठलाकडे बघितलं. त्यांचं ते आवडतं सांवळं रूपडं तेवढंच गंभीर आणि निश्चल होतं. तें रूप मनात कांठोकांठ सांठवित त्यांनी क्षणमात्र ध्यानमय अवस्थेत डोळे मिटले.

गेली वीस वर्षं ह्या मूर्तीनं आणि त्यांच्या आवडत्या ज्ञानेश्वरीनं त्यांची अखंड साथ केली होती. गेली वीस वर्षं!

केवढा अगतिकतेचा आणि वेदनामय काळ! अचानक त्या काळाच्या आठवणी त्यांच्या त्या समाधिस्थ अवस्थेत डोकावून गेल्या आणि त्या अचानक डोकावण्यानं ते शहारले. त्याचं लक्ष विचलित झालं आणि एकाएकी मन विचलित झाल्याचं जाणवून ते अस्वस्थ झाले. हे असं अस्वस्थ होणं अयोग्य होतं. समाधीचा असा भंग होता कामा नये. गेल्या वीस वर्षांपासून मनाला लावलेलं हे वळण. दुःखाच्या धारेला वोथट करून टाकण्यासाठी प्रयत्नपूर्वक केलेली ही कर्मकठीण साधना. एका क्षणाच्या विचलनानं तिला गालबोट लागावं हे अयोग्य होतं. त्यानी मन एकाग्र करण्याचा प्रयत्न केला. दृष्टीला अक्षरांशी जखडून टाकलं.

**तेव्हा बैसतेनी आनंदे। म्हणे जी जे उपनिषदे।**
**नेणती तें व्यास प्रसादे। ऐकिले मियां।।**

श्रीकृष्णानं अर्जुनाला सांगितलेली ती ज्ञानगंगा ऐकून संजयाची झालेली उन्मन अवस्था. भगवंताच्या त्या ज्ञानगोष्टी ऐकताच त्याच्यावर पडलेली ती ब्रह्मत्वाची मिठी.

माधवरावांनी त्या ज्ञानगंगेत बुडी मारण्याचा प्रयत्न केला. पण ती ह्यावेळी त्यांना साधली नाही. संजयाच्या भावनांशी एरव्ही एकरूप होणारं त्यांचं मन आज अनपेक्षितपणे नाठाळून उभं राहिलं.

ते ह्या अचानक बदलानं हादरले. विठ्ठलाच्या मूर्तीकडे त्यांनी करुणामय नजरेनं टक लावून बघितलं. बघता बघता त्यांचे डोळे भरून आले.

"विठूराया, साऱ्या संसाराचा मोह सोडून तुझी कांस धरली. वीस वर्षांची तपस्या अशी क्रूरपणानं लाथाडू नकोस रे!"

ते पुटपुटले. त्यांनी बैठक नीट केली आणि वाचू लागले; मनात विठ्ठलाचा धावा करीत—देवा मला बळ दे....

अहो अर्जुनाचेनि मिषे...

अर्जुनाचं निमित्त करून भगवंतानी जगाला पावन करायला ज्ञान सांगितलं. दुःख आणि सुखाला एकाच पारडयात मोजणाऱ्या महात्म्याचं भगवंतांनी चित्र रेखलं. त्यांच्या धारणेत हे त्यांच्यासारख्या अपयशी जीवन लाभलेल्या व्यक्तींच्या मार्गदर्शनासाठीच होतं. अपयशानं हादरून सामान्य माणसानं खचून जाऊ नये म्हणून भगवंतानी केवढा खटाटोप केला होता!

ते अडखळले. ह्याच तत्वज्ञानाच्या बळावर आयुष्यात अपयश पचवित आलेला त्यांचा जीव ह्या एका शब्दावर आता अडखळला. प्रयत्नानं गेली वीस वर्षं सावरून धरलेलं त्यांच्या मनाचं वारू आज त्यांच्या इच्छेविरुद्ध बेलगाम उधळण्याचा प्रयत्न करू लागलं. आंसवानी भरलेल्या डोळयांना विठ्ठलाची मूर्ति दिसेनाशी झाली. प्रयत्नानं दूर सारूनसुद्धा गेली वीस वर्षं त्यांच्या डोळयांपुढं आता एखाद्या नाठाळासारखी पिंगा घालू लागली.

घरच्या इस्टेटीचा सांभाळ करावा म्हणून त्यांच्या वडिलांनी त्यांच्या इच्छेविरुद्ध शिक्षण बंद करून वयाच्या चौदाव्या वर्षी त्यांच्या गळयात टाकलेली जबाबदारी आणि त्यामुळे त्यांना अकाली आलेलं प्रौढत्व. मुलांनी घर भरलेलं असावं, म्हणून अल्पवयातच त्यांच्या आजाराचा विचार न करता घडवून आणलेलं लग्न. त्यानंतर पत्नीची सुरू झालेली बाळंतपणं आणि प्रत्येक खेपेस झालेल्या मुली!

माधवरावांनी अकाली अंगावर पडलेलं प्रौढत्व आपल्या आजारानं किरकोळ झालेल्या खांद्यांवर सांवरून धरलं. घराची जबाबदारी सांभाळणारा माणूस म्हणून त्यांच्यावर होणारा कुटुंबातल्या सर्व व्यक्तींच्या अपेक्षांचा माराहि तोलून धरला. ह्या अपेक्षांमधूनच मधून मधून होणाऱ्या वैयक्तिक आवडीनिवडीची कुचंबणा सहन करण्याची संवय केली.

त्यांच्यावर पडलेला ताण पार्वतीबाईना बघवत नव्हता. सासू, सासरा, नणंद आणि दीर ह्या सगळ्या अडथळयांच्या आड राहून त्या कुठून तरी कोपऱ्यात उभ्या राहून माधवरावांवर सहानुभूती आणि दुःखाचा चोरटा कटाक्ष टाकण्याचा प्रयत्न करीत. पण सासूच्या कांटेकोर शिस्तीच्या नियमाखाली वावरणारी ती बाई आपले जखडलेले पाय सोडवून त्यांच्याकडे धाव घेऊ शकत नव्हती. माधवरावांच्या लक्षात त्यांची अवस्था येई आणि ते अस्वस्थ होत पण आपण घेतलेल्या भूमिकेत ते बसणार नाही म्हणून त्यांनी पत्नीची नजरहि टाळती ठेवली. अखेर तर आपली अकाली प्रौढ वागणूकच त्यांनी आपल्यात आणि पत्नीत नागिणीसारखी पसरून टाकली. कधी काळी त्यांच्या कणवपूर्ण नजरेतून ते चोरटं समाधान टिपीत आणि त्या चोरटया नजरेची उशी घेऊन आपलं मन



## 'स्याचिंग'

काळी चप्पल काळी साडी, कंचुकीही काळीच होती
भुजा-नग्न कंचुकीतून, काळीच भुजा दिसत होती
पोनीटेल रिबिन काळी, पर्स सुद्धा काळीच होती
नाकावरती चष्मा काळा, भाळी टिकली काळीच होती
काळी मूठ छत्री काळी, कर्ण भूषणे काळीच होती
शिताफळाच्या बियासारखी, गळ्यात माळ काळीच होती
घड्याळाचा पट्टा काळा, डायल सुद्धा काळीच होती
एकच बांगडी कचकड्याची, ती ही पण काळीच होती
पर्स मधून नोट काढली, ती ही पण काळपट होती
कंडक्टरला तिकीट तेही, काळा घोडाच मागत होती
ओठावरती मात्र तिथे, लाल भडक लिपस्टीक होती
सारा भास उदबत्तीचा, धुरासारखी हालचाल होती

**—पंडित महाजन**

शांत करीत. अंथरुणावर पडून राहत. पण त्यापेक्षा त्यानी अधिक पुढं पाऊल टाकलं नाही. कित्येकदा पत्नीशी चार सुखदुःखाच्या गोष्टी बोलून मनाचा भार हलका करावा अशी त्यांना इच्छा होई पण मग ते कमीपणाचं वाटून तो विचारच ते झटकून टाकीत. घेतलेल्या भूमिकेशी ते विसंगत दिसेल, ह्या भयानं ते हिशेबाच्या वह्या काढून तासन् तास हिशेब लिहीत बसत किंवा नोकर चाकरांपासून कामाचा आढावा घेत बसत.

पण त्यामुळं ते अंतःकरणातून अधिकाधिक अस्वस्थ होऊन जात. अखेर ही आंतरिक अस्वस्थता त्यांचा मूक सोबती होऊन बसली होती.

वाचता वाचता माधवरावांच्या स्मृति तोल सुटून त्यांच्या इच्छेविरुद्ध उलगडीत गेल्या, अधिकच उलगडत गेल्या.

त्यांच्या वडिलांची दरारा निर्माण करणारी मूर्ति त्यांच्यासमोर उभी राहिली. एवढी मोठी इस्टेट एकट्याच्या सामर्थ्यावर उभी करणारी ती लहानशीच पण करारी आकृति त्यांच्या पुढे येताच ते अभावितपणे संकोचले. एवढी इस्टेट अल्पावधीत गोळा केल्यानंतर आलेल्या रास्त अहंकारानं वागणारे त्यांचे वडील आणि त्यांचा हेकेखोर हट्टी स्वभाव केवळ आठवणीनं त्यांचं अंतःकरण चिरीत गेला. ह्या व्यक्तीनं स्वतः ऐन उमेदीत असताना एवढ्या मोठ्या इस्टेटीची जबाबदारी स्वतःच्या चौदा वर्षाच्या कोवळ्या पोराच्या गळ्यात हेकेखोरपणानं बांधून स्वतःकडे नेणत्याची भूमिका घेतली होती.

त्यांना वडिलांच्या उग्र स्वभावाची आठवण आली आणि त्यांच्या लहरीवर स्वतःच्या कौटुंबिक सुखाची केलेली कुरवंडी विजेच्या दाहकतेनं त्यांचं अंतःकरण चिरीत गेली.

मग त्यांच्या डोळ्यासमोरून त्यांच्या एकत्र असलेल्या भल्या थोरल्या कुटुंबातील व्यक्ती तरळून गेल्या. घाकटेपणाच्या आवरणाखाली त्यांच्याकडे झालेल्या अवास्तविक मागण्या आणि कर्तव्यभावनेनं त्यांनी त्यांची केलेली पुरवणी. त्यामुळे हिशेबातली अवास्तवता वडीलांच्या उग्र नजरेतून सुटावी म्हणून हिशेबांची जुळवणी करताना त्यांच्या मनाची झालेली तळमळ.

त्यांच्या डोळ्यांसमोर ह्या सर्व गत घटना उभ्या राहिल्या आणि त्यातून त्यांच्या पत्नीचा दीनवाणा चेहरा डोकावू लागला. आपली जबाबदारी पार पाडताना तिच्या न्याय्य पण अल्प मागण्यांची स्वार्थ दिसू नये म्हणून त्यांनी केलेली अवहेलना त्यांच्या डोळ्यापुढं ठळकपणानं विषाद भरीत उभी राहिली.

कर्तव्यनिष्ठेच्या अवजड भाराखाली सुखदुःखाची वाटेकरी म्हणून त्यांच्या पावलाला पाऊल जखडून त्यांच्या जीवनाची साथीदारीण ठरलेल्या त्या स्त्रीच्या आशा आकांक्षेचा आपल्या हातांनी केलेला निर्घृण मेघ त्यांच्यापुढे उभा राहिला. जबाबदारी आणि कर्तव्य ह्यांच्या मोठेपणाचं आजपर्यंत घेतलेलं तकलादू पांघरूण आज विसविशीत होऊन फाटलं आणि त्यांच्या हातून घडलेल्या घटना त्यांच्या परिणामासहित उघड्या नागड्या होऊन त्यांच्यापुढे उभ्या राहिल्या, आणि त्या पार्श्वभूमीवर त्यांच्यावर त्यांच्या कुटुंबियांनीच केलेल्या प्रतारणेच्या कथा काळे कुट्टे ओघळ पसरवित पसरून राहिल्या.

त्यांना सारा गतकाळ आठवू लागला. मुलीच मुली होतात सबब ह्याला इस्टेटीचा सारखा वाटा कशाला हवा म्हणून कुटुंबियांनी त्यांच्यावर टाकलेला डाव; हा नेहमी आजारी असतो, ह्याच्या जीवाचा भरवंसा काय, ह्याची इस्टेट अखेर मुलींच्याच घरात जाईल म्हणून त्यांची केलेली लहान वाटणी आणि हा इस्टेटीचा कारभार पहात होता, ह्यानं चोरून पैसा सांठवून ठेवला असेल असा केलेला आरोपहि त्यांच्या पुढं सैतानासारखा नाचू लागला.








आणि मग अचानक त्यांच्या वडीलांचे कडाडते शब्द त्यांना ऐकू आले,

"लोक मेलेली मढी गाडतात; ह्या पोरी मी जिवंतच गाडतो."

त्यांची थोरली मुलगी लहान असता कसला तरी हट्ट घेऊन रडत असलेली बघून तिला उचलून रस्त्यावर नेऊन आदळीत त्यांच्या वडीलानं तिरस्कारानं केलेली गर्जना.

माधवरावांनी एक शब्द न बोलता ते वडिलाचे शब्द गिळले होते, व्यथित झालेल्या पार्वतीबाईंना भगवंताचं नामस्मरण करण्याचा सल्ला दिला होता!

पण त्यांचं व्यथित मन वारंवार विचारत होतं, तुला मुलगा होणारच नाही का? कधी तरी, केव्हा तरी. तुझ्या आत्म्याला ऐहिक आणि पारलौकिक सद्‌गति मिळणारच नाही का?

आणि मग त्यांनी ज्ञानेश्वरी आणली होती. निराश झालेल्या मनाला आधार देण्यासाठी, फाटलेल्या अंत:करणाच्या चिंध्या जुळवून घ्यायला. आणि ती त्यांची गेली वीस वर्षं साथ करीत होती. पत्नीच्या धगधगत्या अंत:करणावर ज्ञानामृताच्या जलधारा त्यांच्या हातून शिंपीत होती!

ह्या साऱ्या आठवणींनी माधवराव आज व्यथित झाले.

हे सारे विचार आज ह्या क्षणीच त्यांच्या मनात कां यावेत हे त्यांना कळेना. आपल्या आयुष्याची संध्याकाळ तर आलेली नाही ना असा विचार चमकून ते अस्वस्थ झाले.

विठ्ठलाकडे आर्त नजर टाकून त्यांनी आळवणी केली, "देवा, कधी नाही ते आज तू माझं मन संभ्रमित करीत आहेस. काय आगळिक घडली रे माझ्या हातून?"

त्यांच्या आर्त सुराला विठ्ठलानं प्रतिसाद दिला नाही. त्याच्यावरची सारी निष्ठा एकवटून ते वाचू लागले,

**चकोराचेनि निमित्ते। तिन्ही भुवने संतप्ते।**
**निववीली कळावंते। चंद्रे जेवि॥**

चकोराच्या मिषाने तिन्ही संतप्त भुवनांना चंद्रकळा शीतल करून टाकते. ईश्वरा, माझ्या गेल्या वीस वर्षांच्या सश्रद्ध








अनुक्रमणिका

भक्तीची फलश्रुति म्हणून तुझ्या दयेचा एखादाहि कण माझ्या वाट्याला येऊ नये.

त्यांनी पांडुरंगाची करुणा भाकली. साऱ्या शक्ति एकवटून वाचायला सुरुवात केली.

उदवत्त्या संपत आल्या होत्या. त्यांची राख तुकड्या तुकड्यांनी घराच्या भोवती थंडपणानं पडून होती. त्यांनी निरांजनाची वात सारली, आणि ओव्यांवर नजर एकवटली.

**तैसे हे गीतेचे दुभते । वत्स करूनी पार्थाते**
**दुभीनली जगापुरते । श्रीकृष्ण गाय ।।**

ज्ञानियाच्या राजाची ती अमृतमय वैखरी त्यांच्या कांपऱ्या जिभेवरून ओघळू लागली. हळुहळू गेल्या वीस वर्षांत वाचून वाचून पाठ झालेली ती वाणी त्यांचं अंत:करण भरून उरू लागली.

क्षणमात्र ते सभोवतीचा विसर पडून ब्रह्मानंदात विलीन झाले.

गंगा सुईणीनं पुन्हा एकदा डोकावून बघितलं. त्यांची लागलेली समाधि तिनं बघितली आणि हिरमुसून ती पुन्हा आत निघून गेली.

माधवराव आता वाचतच होते. जुन्या आठवणींचं मोहोळ मनात उठत असूनहि वाचतच होते. ज्ञानियाच्या राजाच्या त्या पवित्र वाग्गंगेत आपलं मन निर्दय-पणानं बुडवित वाचतच होते.

**सायिखडेयाचे बाहुले । चालवित्या सूत्राने चाले ।**
**तैसा माते दावित बोले । स्वामी तो माझा ।**

त्यांच्या अंत:करणाची कळसूत्री बाहुली वाचीत होती. जगन्नियंता त्या बाहुलीचे दोरे हलवित होता. पहिल्या तीन मुलीच झाल्यामुळे आता आपल्याला मुलगा होणार नाही अशी झालेली त्यांच्या मनाची धारणा त्यांना वाचायला लावीत होती. अपयशाच्या जाणिवेला बुडवून टाकायला त्यांची त्यांनीच निर्माण केलेली ही ज्ञानगंगेची भूल त्यांना वाचायला लावीत होती. पत्नीला प्रसूतिवेदना सुरू झाल्यावरोबर ज्ञानेश्वरी काढून अठरावा अध्याय निस्संगपणे वाचायला लावणारे माधवराव त्या भूलेनं निर्माण केले होते आणि तीच भूल त्यांना "मुलगी झाली" हे सुईणीचं वाक्य पचवायला लावीत होती. अनेकदा पूर्वी ते पचविलं होतं आणि पुढंहि पचविणार होते. त्या ब्रम्हा-नंदात ते विलीन होऊन जाणार होते. भगवंतांनीच नाही का सांगितलं,

**"ब्रह्मभूतः प्रसन्नात्मा न शोचति न कांक्षति !"**

ब्रह्मीभूत झालेला आत्मा दु:खहि करीत नाही आणि आकांक्षाहि धरीत नाही !

म्हणूनच दु:ख पचवून विसरायला त्यांनी निर्माण केलेलं हे ज्ञानेश्वरीचं अवगुंठन. सुखाला आणि दु:खाला एकाच लेखी मानणारं!

माधवराव वाचत राहिले, आणि एकी-कडे भावनावश होत राहिले. विठ्ठला विठ्ठलाचा आर्त चित्कार त्यांचं अंत:-करण भरीत राहिला आणि जिभेवरून ज्ञानेश्वरीच्या ओळी ओघळीत राहिल्या.

पण मग त्यांना हे सारं असह्य झालं. शब्द दिसेनासे. झाले आणि महत्प्रयासानं आवरलेला हुंदका त्यांच्या तोंडून निसटून गेला.

"बापू तुम्हाला मुलगा झाला का जी." गंगा सुईणीनं धीर धरून त्यांच्याजवळ येऊन म्हटलं.

माधवरावांचं लक्ष पहिल्यांदाच तिच्याकडे गेलं. आपल्या डोळ्यात अश्रू आहेत ते जाणवून लगबगीनं त्यांनी ते पुसून काढले. स्वरातला केविलपणा झांकीत मोठ्या प्रयासानं ते म्हणाले,

"केवढं अमोल तत्वज्ञान! अंत:करण ब्रह्मानंदानं कसं उचंबळून आलं !"

पण त्यांचा त्यांनाच स्वत:च्या शब्दांचा विश्वास वाटला नाही.

गंगा सुईणीला त्यांचे शब्द कळले नाही. त्या अडाणी बाईचं सारं लक्ष तिच्या हातातल्या नुकत्याच जन्मलेल्या नाळानं भरलेल्या त्या गोळ्याकडेच होतं. तो एवढासा जगाकडे निरपेक्ष नजरेनं पहाणारा लुकलुकता जीव माधवरावांच्या पुढ्यात धरीत ती उद्गारली, "तुम्हाला मुलगा झाला बापू. वाड्याला नवा मालक झाला जी!"

माधवरावांच्या अंत:करणात अचानक काही तरी चमकून गेलं. आपला थर-थरता हात वर उचलून त्यांनी तो लालसर चैतन्यमय गोळा न्याहाळला आणि मग सर्व बंधने विसरून त्यांनी अश्रूंना मुक्त वाट करून दिली.

गेल्या वीस वर्षांत प्रथमच त्यांना ब्रह्मा-नंदाचा विसर पडला; पहिल्यांदाच त्यांच्या अंत:करणात ज्ञानियाच्या राजाच्या अमृतमय वाणीलाही मागे पाडणारे शब्द उठून राहिले,

"बापू तुम्हाला मुलगा झाला जी!"

आणि मग त्यांच्या कापऱ्या हातून दोरीचं एक टोक सुटून ज्ञानेश्वरीच्या पोथीला अकस्मात् निरगाठ पडली!

●●●

---

[पृष्ठ १५ वरून–अशापित...]

मी हिला पहातो.

ती सकाळच्या साखरझोपेत मग्न आहे. पूर्वेकडचा मंद समीर तिच्या केसांच्या बटांशी खेळत आहे. तिचा स्निग्ध चेहरा शांत, प्रसन्न आहे.

मी तिच्या चेहऱ्यावरची प्रसन्नता लोभसपणे दृष्टीत सांठवून ठेवतो.

तिला पाहून वाटतं, आपण आपलं अस्तित्व विसरून जावं. तिच्या स्नेहाक्त पापण्यांच्या पंखाखाली माझ्यातला 'मी' वितळून जावा.

तिचा सुगंधित श्वासोच्छ्वास,आत्म्याच्या गाभाऱ्यात दरवळत रहावा.

तिच्या वक्ष:स्थळाच्या स्पंदनात आत्म्याचा हुंकार ऐकू यावा.

माझी 'उमा' माझ्या मिठीत असते.

मी तिच्या गालावर हळूवारपणे फुंकर मारतो. तिच्या वेणीचा शेपटा तिच्या गालावरून मोरपिसासारखा फिरवतो.

ती संथपणे पापण्या उघडते. त्यासरशी माझ्या मनात असंख्य कमळं उमलतात.

मी तिच्या कुशीत शिरतो. तिचे ओठ माझ्या ओठात घेतो. ओठांची मिठी घट्ट होते.

मी म्हणतो, "गुडमॉर्निग, मादाम उमा."

ती गोंधळते. माझ्याकडे डोळे विस्फा-रून वेड्यासारखी पाहू लागते.

तिला या अपरिचित सांकेतिक नांवाचा बोध होत नाही.

ती फक्त माझीच गंमत असते. माझं एकट्याचं रहस्य .......

अन् म्हणूनच,

अळी मिळी गुप चिळी हेच बरं!

●●●










जरा जोराने पुढे जाऊन हिचा चेहरा पहावा का ? पण नकोच ! आतापर्यंतचा अनुभव वेगळाच होता. पाठमोरे सौंदर्य दिसते म्हणून मुद्दाम पुढे जाऊन चांगले पहावे तर.....



# तुझे तुझ्याचपाशी आहे !

## -पंडित क्षीरसागर

**विकास** बसमधून डेक्कन जिमखान्याच्या स्टॉपला उतरला. त्याला जंगली महाराज देवळाजवळ राहाणाऱ्या मित्राकडे जायचे होते. तिकडे जाण्यासाठी त्याला दुसऱ्या नंबरची बस पकडावी लागणार होती. तो त्या बसच्या स्टॉपवर आला. पाहतो तो त्या स्टॉपवर ही गर्दी ! पहिल्या दोन बसमध्ये तर त्याला नक्कीच जागा मिळाली नसती. त्यापेक्षा पायी तो लवकर पोचला असता. म्हणून तो पायीच तिकडे जाण्यास निघाला. जाता जाता त्याने समोर नजर टाकली. आणि तो थक्कच झाला.

त्याच्या जरा पुढे एक तरुणी चालली होती. पण तिचे चालणे इतके डौलदार होते की तो पहाताच राहिला. तिच्या आवळचा-जावळचाची लयबद्ध मनोहर हालचाल होत होती. तिची अंगकाठीही सुदृढ दिसत होती. त्यामुळे तिचे डौलदार चालणे मोठे मोहक वाटत होते. जर ती सुदृढ आणि अंगाने भरलेली नसती तर तिची चाल इतकी डौलदार खासच वाटली नसती. शिवाय तिने पातळ अगदी चापूनचोपून नेसल्यामुळे तर तिच्या पृष्ठभागाला वेगळीच शोभा आली होती. तिने दोन वेण्या घातल्या होत्या. त्याला दोन वेण्याची पद्धत फारच आवडत होती. त्या वेण्यांचीही लंबकासारखी लयबद्ध गोड हालचाल होत होती. तिची मान नितळ आणि गोरीपान दिसत होती. मानेवर सोन्याची साखळी दिसत होती. पण ही नुसतीच सोन्याची साखळी नसावी, तर मंगळसूत्राच्या मागच्या बाजूची साखळी असावी. हिचे नक्कीच लग्न झालेले असावे. त्याखेरीज हिचा पृष्ठभाग इतका मोहक आणि भरीव होणार नाही. त्याला वाटले, बरे झाले आपण पायी जाण्याचा निर्णय घेतला. नाहीतर हे पाठमोरे स्वर्गीय सौंदर्य आपल्याला दिसले नसते. जरा जोराने पुढे जाऊन हिचा चेहरा पहावा का ? पण नकोच. कारण त्याचा आजपर्यंतच्या अनुभव वेगळा होता. पाठमोरे सौंदर्य चांगले दिसते म्हणून मुद्दाम पुढे जाऊन तो चेहरा त्या सौंदर्याला अगदीच विशोभित निघे. मागून सुंदर दिसणारी तरुणी पुढून अगदीच सामान्य दिसे. अशावेळी आपण मुद्दाम पुढे आलो याचा त्याला पश्चात्ताप होई. त्यापेक्षा पुढे आलो नसतो तर निदान पाठमोरे सौंदर्य तरी डोळे भरून न्याहाळता आले असते. म्हणन आताही त्याने त्या तरुणीच्या मागूनच चालणे पसंत केले.

त्याला एकाएकी आपल्या बायकोची आठवण आली. आपली बायको खूप सुंदर आहे. पण तिला टापटीपीने राहणे अगर रंगसंगतिने कपडे निवडून घालण्याचे जराही हौस नाही. अगदी गबाळी आहे नुसती. तिने जर पातळ चापूनचोपून नेसले, दोन वेण्या घातल्या तर ती खात्रीने या समोरच्या तरुणीपेक्षा जास्त चांगली दिसेल. पण ती पातळ कशीतरी गुंडाळीत असे. अंबाडा घालीत असे. पातळे निवडण्यासाठीही ती त्याच्याबरोबर दुकानात येत नसे. त्यालाच आणायला सांगे व तो आणील ती पातळे घालीत असे. तो चांगले भारी भारी उत्तम कपडे तिला आणीत असे. पण तिच्या गबाळचा वृत्तीने त्या कपडचांचे चीज होत नसे, याचेच त्याला मनापासून वाईट वाटे. त्याच्या मित्रांच्या बायका त्याच्या बायको-इतक्या सुंदर नव्हत्या. पण त्या इतके नेटकेपणाने राहात की त्या त्याच्या बायकोहूनही मोहक दिसत. त्यामुळे त्याला बायकोचा फार राग येई. पण तिने आपल्या रहाणीत जराही बदल केला नाही. त्यामुळे "आमची बायको अशी राहिली असती तर तीही अशीच डौलदार दिसली असती," एवढेच म्हणणे त्याच्या हाती होते. त्याने एक सुस्कारा सोडला.

ती तरुणी आता उजव्या रस्त्याला वळणार असे दिसू लागले. त्याला त्या रस्त्याने जायचे नव्हते. पण तो ते पाठमोरे सौंदर्य मिळेल तेवढा वेळ पहाण्यासाठी त्याच रस्त्याला वळणार होता. ती तरुणी वळली आणि तिच्या चेहऱ्याचा अर्धा भाग त्याला दिसला. आणि त्याला धक्काच बसला. त्याचवेळी त्या तरुणीने सहज त्याच्याकडे पाहिले व तीही आश्चर्याने थबकून तिथेच उभी राहिली. ती त्याचीच बायको कुमुदिनी होती. तो घाईघाईने पुढे झाला व म्हणाला, "कुठं चाललीस?" "माझी मैत्रीण पुण्याला आली आहे. तिने येथला पत्ता दिला आहे. तिला भेटायला चालले आहे."

आणि तो तिच्याकडे निरखून बघत आहे हे लक्षात येताच काहीशी लाजून ती म्हणाली, "मैत्रीणीकडे गबाळचा वेषात कशी जाणार ? म्हणून जरा टापटीपीने व नीटनेटका पोषाख करून चालले आहे." तो म्हणाला, "मैत्रीणीसाठी जेवढी काळजी घेतेस तेवढी नवऱ्यासाठी घेतलीस तर. . ."

●●●









अनुक्रमणिका

## २

**कृष्ण मेघाला विद्युलतेची रुपेरी कडा तशी कीचकाला लाभलेली रसिकता. कीचकासारखा महान योद्धा व पराक्रमी राजा नृत्य आणि अश्वारोहण यासाठी त्रिभुवनात प्रसिद्ध. त्याची बहीण सुदेष्णा त्याला काहीही करून विवाहबद्ध करण्यासाठी प्रयत्न करीत असते. याच सुमाराला बृहन्नल आणि सैरंध्रीला सुदेष्णा आश्रय देते. कीचकाच्या मनात त्यांना पाहून द्वंद्व सुरू होते. . . .**

★ स्वैर रुपांतर ★

प्रा. श्री. र. भिडे




**की:**– नांव काय म्हणालीस? बृहन्नल ! हे नांव तर पूर्वी कधीच ऐकल्यासारखं वाटत नाही. हे स्वतःला बृहत्–नल म्हणवून घेतात काय?.. बाकी तेंही ठीकच आहे म्हणा. निषध राजाचा नृत्यशास्त्र, पाकविद्या आणि द्युत यांतील श्रेष्ठ लौकिक सर्वश्रुतच आहे. ताई! त्याचं निरुपम सारथ्यकर्महि तुला ठाऊकच असेल. माझ्याप्रमाणेच तोहि एक श्रेष्ठ दर्जाचा योद्धा होता असंहि मी ऐकलं आहे. छेः पण आपण उगीचच काही तरी बोलत बसलो आहोत. (थोडे थांबून) बृ–ह–न्न–ल! कानाला तर हे नांव फारच आनंददायक वाटतं...मीच त्यांना बोलावून सांगतो.. अहो बृहन्नल.. (आपले छोटे हात कमरेवर ठेवून संशयित होत्साता बृहन्नल थबकतो..) तुमच्या नांवाची सार्थकता माझ्या नेत्रांनी जाणली आहे.. ही विद्या संपादन करण्यासाठी आपण कोणकोणत्या देशांना जाऊन आलात ? द्वारका, उत्तरेकडील पर्वत किंवा नागभूमि आपण पाहिली आहे काय? परंतु हे तरी विचारण्याची आवश्यकता काय? तुम्ही बऱ्याच देशांना भेटी दिल्या असल्याच पाहिजेत यात शंकाच नाही...कदाचित् भ्रमंतीनं तुम्ही थकलाहि असाल.. कुठं तरी स्थायिक होऊन आत्मसात् केलेली विद्या– तळमळणाऱ्या शिष्यांना द्यावी... या इच्छेनेच प्रेरित होऊन तुम्ही येथे आला असाल.. हे असंच असायला हवं.. हेच खरं मानवी कर्तव्य आहे... ताई म्हणते की तुम्हाला या राज्याची माहिती आहे. इथंच राहून या आमच्या मुलांना शिक्षण देणं तुम्हाला आवडेल काय? मलाहि आता विश्रांति घ्यावी असं वाटू लागलं आहे... कित्येकदा तर असंही वाटतं की आता चिरकालीन विश्रांति घ्यावी.. आतापर्यंत शिरावर घेतलेला हा भार खाली उतरून मनाला संपूर्ण शांति मिळावी एवढीच इच्छा आहे.. माझी ही जबाबदारी कमी करण्यास तुम्ही सर्वथैव योग्य आहात.. रहाल तुम्ही इथं.. ? कदाचित् त्यायोगे तुमचंहि इप्सित पूर्ण होईल... (शिष्यांकडे अंगुलीनिर्देश करून) घ्याल ना या सर्वांची काळजी?

[ अनुमतिसूचक वंदन करून बृहन्नल शांतपणे नृत्य सुरू करतो ] तुमची अनुमति आहे, ठीकच झालं. ताई, केवढं माझं भाग्य! यांच्यापासून ही मुलं अल्पावधीतच सारं काही शिकतील आणि ह्या शिष्यांच्या सहवासात यांनाहि बरं वाटेल, अशी व्यवस्था कर. यांच्या दृष्टीत मला दुःखाची एक सूक्ष्म छटा दिसते. ताई, हे सुखात राहतील अशी काळजी घे. त्यांना काही कमी पडू देऊ नकोस. नि हे पहा मी आत्ताच सांगितल्याप्रमाणं यौवनात पदार्पण करणाऱ्या उत्तरेचा विवाह कोणाशी तरी होण्यापूर्वीच तिचं सारं शिक्षण पुरं व्हायला हवं.. काय ग तिच्यासाठी एखादा वर पाहून ठेवला आहे का नाही?

**सु:**– तिच्या लग्नाची मला फारशी काळजी नाही वाटत, पण दादा....

**की:**– मग कोणाच्या ?

**सु:**– तुझ्या.. दुसऱ्या कोणाच्या ? केवळ तुझ्या लग्नाची...

**की:**–(चिडून) हे पहा ताई, 'माझं लग्न' या अक्षरांचा उच्चार सुद्धा करू नकोस म्हणून तुला किती वेळा सांगू.. तुझा आपला सारखा तगादा चालूच आहे! पंचवीस वर्षं झाली असतील त्या

अनुक्रमणिका

घटनेला, त्या सुंदरीचं दर्शन घडताच क्षणभर माझी नाडीच बंद पडली की काय असा मला भास झाला होता... नि त्यावेळी मी जिला मनानं वरलं होतं तिच्याशीच मी लग्न करायला हवं होतं. तिनंही मला पसंत केलं होतं असं त्यावेळी बोललं जात होतं.. तो दिव्य स्वयंवर मंडप.. तो धनुर्विद्येचा पण.. पण लावला असूनहि त्याला स्वयंवर म्हटलं जात होतं. वास्तविक त्यामुळं तिला इच्छेनुरूप पतीची निवड करता येत नव्हती.. तिच्या इच्छेप्रमाणं... पण तसं व्हायचं नव्हतं... तसं घडलंहि नाही.. नि त्याच वेळी मी निश्चय केला की यापुढं कोणत्याहि स्त्रीकडं विवाहाच्या दृष्टीनं पाह्यचं नाही.. तिचा तिच्या मनावर हक्क नव्हता... ती म्हणजे धनुर्विद्येचे नैपुण्य सिद्ध करणाऱ्या धनुर्धराला द्यावयाचे एक पारितोषिक बनवली गेली होती. एक बक्षिसाई वस्तु अशी तिची संभावना केली गेली होती... नि एका धनुर्धाऱ्याने पण जिंकला व त्याचे पत्निपद तिला स्वीकारणे भाग पडले. या एका बक्षीसात इतर चार भावानी वाटणी मागितली.. द्रुपदाच्या एका मुलीला पांच नवरे! आणि एकावेळी पांच पति असूनहि एकाने आप्तेष्टांशी द्युत खेळताना ती पणाला लावली.. तो हरला.. पतींच्या बरोबर मुकाटयानं तिला जंगलाचा रस्ता सुधारावा लागला.. तिथं तिला जी दुःखं भोगावी लागली ती इतकी अनिर्वचनीय... परंतु झाल्या गेल्या गोष्टींचा मी तरी इतका विचार कां करावा? या जुन्या स्मृति चाळवण्यात काय अर्थ आहे? ताई... मुद्याचंच सांगायचं तर कृपा करून यापुढं कधीहि माझ्या लग्नाचा विषय काढू नकोस.. तिच्याबरोबरच माझं हृदयहि विलयाला गेलं... कदाचित् तीहि आपल्या दुर्दैवाला बोल लावून स्वतःलाच म्हणत असेल—'इच्छेनुरूप पति निवडण्याचे मला जर स्वातंत्र्य असते तर... परंतु नाही.. मी शापित असल्यानं तसं व्हायचंच नव्हतं...'... ताई, भगिनीच्या नात्याने माझ्या सुखासमाधानासाठी आणि सेवेसाठी तू जरी तरुणींचा घोळका माझ्याभोवती उभा केलास तरी मी शुकाच्या निष्ठेने त्यातल्या कोणत्याहि रंभेकडे पाहणार सुद्धा नाही... मी मनापासून बोलतो आहे नि माझ्या शब्दावर तू विश्वास ठेवावास हे बरं.... मी स्वारीहून जेव्हा जेव्हा घरी परत येतो तेव्हा पहावं तर तू हे असंच करत असतेस. असं तू कां करावंस याचं मला मोठं आश्चर्य वाटतं... पण आता मला त्यामागचं रहस्य कळलं. ताई, आपल्या या राज्यात कोणताहि पुरुष स्वस्त्रीखेरीज अन्य कोणत्याहि स्त्रीकडे या दृष्टीने कधीच पहात नाही.. पाहणार नाही.. या मर्यादेचं उल्लंघन करणाऱ्या व्यक्तीला या कीचकाच्या राज्यात, विराटसुदेष्णा देहान्ताची शिक्षा ठोठावल्याशिवाय राहणार नाहीत, ही खात्री आहे ना तुला? नि अशा प्रकारची शिक्षा दिल्याचं उदाहरण गेल्या कित्येक वर्षांत शोधूनहि सांपडणार नाही.. तेव्हा ताई.. तू हा नाद सोड. माझ्या लग्नाचा विचार करण्यापेक्षा आता उतरेच्या लग्नाचा विचार खरोखरच करायला हवा.... पाहून ठेवला आहे का कोणी तिच्यासाठी?...एखादा अनुरूप.....



**कैलासम्** हे कर्नाटकाचे एक ज्येष्ठ व श्रेष्ठ नाटककार असून इंग्रजी व कन्नड भाषेत लिहिलेली त्यांची १५–२० नाटके प्रसिद्ध आहेत. त्यांची काही नाटके अप्रसिद्ध आहेत. तर काही नाटके त्यांच्या मित्रांनी त्यांच्या संभाषणावरून लिहिली आहेत. त्यांची नाटयसंपदा येणेप्रमाणे:

**मोठी नाटके:**—टोळ्ळु गट्टी (भाग १ व २), ताळी कट्टो कुलीने?, बंड्वाळविल्लद बडाइ, होम रुल, अम्मावग्रंड, पोलि किट्टी, सत्तवन संताप, हुत्तदल्ली हुत्त आणि सूळे

**छोटी नाटके:**—नम्म ब्राह्मणके, बहिष्कार, नम्म क्लब्बु, नम्म कंपनी, वैद्यन व्याधी गंडस् कत्री, अनुकूल कोब्बण्ण, आणि सीकरणे सावित्री.

**Little lays and plays:** – तावरे केरे, वैद्यन जाड्य आणि Purpose (या नाटकाचा अनुवाद श्री. के. नारायण काळे यांनी मराठी भाषेत केला आहे.)

**अप्रसिद्ध नाटके:**— Fulfilment, Expiation, The curse (भार्गव शाप), The Fear (मार्कंडेय शाप),The Torture (हरिश्चंद्र हिंसा), The Release (मकरंद्र मोक्ष).

**Retold:** The Vow (द्रोणद्रु पद), The Remoarse (सीता परित्याग) The abnegation (भीम), Renuka, The Passing Radha त्रिशंकु शबरी, भीष्म (एकरात्र) आणि कीचक.

सु:– ठेवला आहे मी पाहून... अगदी अनुरूप..

की:– हे कसं छान बोललीस.. कोण आहे तो भाग्यवान् पुरुष?

सु:– एकच नाही.... दोन...

की:– छान.. द्रौपदीनं पांच केले त्याप्रमाणं... अगदी तिच्या पावलावर पाऊल...

सु:– तशा अर्थानं नाही म्हटलं मी, दादा! या आमच्या राज्यात एका स्त्रीनं एकच पति करायची प्रथा आहे, हे मला ठाऊक का नाही... मी म्हटलं कीं दोन तरुण पाहून ठेवले आहेत.. त्यातून एकाची निवड उत्तरेनंच आपल्या मनाप्रमाणं करावी... तुझ्या मेव्हण्यांनी... सम्राटांनी माझी निवड नि मी त्यांची केली.. अगदी त्याप्रमाणंच......

की:– ठीक: ठीक: चांगला आहे बेत, परंतु हे दोन भाग्यशाली पुरुष कोण ते तू अद्यापहि सांगितलंच नाहीस...

सु:– दुसरे कोण? तुला ठाऊकच आहेत कीं.. हस्तिनापुरचे अभिषिक्त युवराज सुयोधन महाराजांचे पुत्र लक्ष्मण नि वनवासी अर्जुनाचा तरुण मुलगा .....सौभद्रेय... अभिमन्यु....

की:– लक्ष्मण आणि अभिमन्यु! ताई, तुझी पसंती उत्तम आहे. मला फार आवडली.. पण काय ग सध्या अभिमन्यु आहे कुठं ? कदाचित् आपल्या काकांबरोबर, नि वडिलांबरोबर एखाद्या जंगलातहि असेल... परंतु नेमका कोणत्या जंगलात आहे हे कसं समजावं... मी त्याला लक्ष्मणापेक्षा कितीतरी अधिक गुण देईन... परंतु त्याचा शोध लागायलाच वर्षानुवर्षे लागतील. मग लक्ष्मणाचीच एकदम निवड कां करू नये? तोहि तसा गुणी आहे नि शिवाय जवळचाहि आहेच.

सु:– पण दादा, आपण सुयोधनाचे मांडलिक आहोत हे तुझ्या लक्षात नाही वाटतं.. उत्तरेचं जर त्याच्या मुलाशी लग्न




झालं तर तिचं जीवन त्याच्या हाती जाईल हीच मला काळजी आहे. पत्नीत्वाच्या हक्काऐवजी केवळ नामधारी सौख्यच तिच्या वाट्याला नाही आलं म्हणजे मिळवलं!

की:– परंतु ताई, अखिल आर्यावर्ताच्या सिंहासनाच्या युवराजाची ती राणी होईल ना! त्याच्या हाताखाली दास्यत्वानं सारं जीवन घालवावं लागेल अशी भीति बाळगू नकोस. कदाचित् ती अधिक सुखीहि होईल... उगीच कां काळजी करतेस?

सु:– दादा, आईच्या हृदयाच्या वेदना तुला नाही कळायच्या. बरं पण समज तू आणि मी उत्तरेला लक्ष्मणाला द्यायचं योजलं, तरी ते तिला रुचेल का? तू म्हणतोस, त्याप्रमाणं द्रौपदीला जर पतीची निवड करण्याचं स्वातंत्र्य असतं तर तिनं जसं तुलाच वरलं असतं, त्याचप्रमाणे उत्तरेलाहि जर मनाजोगा पति निवडण्याची मुभा मिळाली, तर मला वाटतं–कां कोण जाणे; ती अभिमन्यूचीच निवड करील. विवाहोत्तर दोघानाहि सुख लागावं म्हणून भारतातील इतर राज्याप्रमाणं मत्स्यदेशात मुलींना पसंतीनुसार पति निवडण्याचं पूर्ण स्वातंत्र्य दिलं जातं... आणि म्हणूनच माझ्या मुलीचं खात्रीनं मन जिंकू शकेल असा तो तरुण कुमार– अभिमन्यु सांप्रत कोठे असेल याच काळजीत मी आहे.

की:– (सावकाश) तुझं म्हणणं खरं आहे.. उत्तरेच्या सुखासमाधानाचा विचार करूनच हा प्रश्न सोडवायला हवा. शिवाय मी असं ऐकलं आहे की हा कुमार आपल्या वडिलांसारखाच धनुर्विद्येत निपुण असून आपल्या मामांच्या–माझ्या गुरूंच्या गुणांचा वारसा सिद्ध करणारा आहे. उत्तरेनंहि आपल्या मामांचे गुण–माझी विद्या–आत्मसात् केली आहेच. तेव्हा उत्तरेनं जर अभिमन्यूलाच पसंत केलं तर पुढं मागं तो माझी जागा नक्कीच विभूषित करू शकेल. ठीक आहे... आता उत्तरेचं सारं सुख केवळ तिच्याच हाती आहे... अभिमन्यूचीच निवड व्हायची असेल तर त्याच्या शोधार्थ मला गेलंच पाहिजे (उठण्याचा प्रयत्न करून) त्याला शोधून काढण्यात मला आनंदच आहे.

सु:– (कीचकाला बसवत) दादा, मी नाही तुला आत्ता जाऊ देणार.. नुकताच तर तू कुठं त्या जीवघेण्या युद्धावरून परत आला आहेस. तुला आता विश्रांतीची खरी जरूर आहे. अभिमन्यूचा शोध घ्यायला इतर कोणी माणसं का नाहीत ? हे काम काही केवळ तुझ्यासारख्यानंच केलं पाहिजे असं नाही. त्याच्या शोधार्थ धाडायला माणसं खूप आहेत, परंतु त्यांना धाडायचं तरी कुठं?

की:– कुठं म्हणजे? अफाट जंगलात. जंगलाशिवाय दुसरीकडे असणंच शक्य नाही...ताई, मला नेहमी असं वाटे की वनवासी पांडवांनी आपल्या या नगरीत एकदा तरी यावं, थोडे दिवस इथं रहावं आणि अल्पकाळ का होईना आपली दुःखं कमी करण्याचा प्रयत्न करावा. त्यांच्या इथल्या वास्तव्यात त्यांच्या सुखासमाधानाकडं खूप लक्ष द्यावं अशी माझी इच्छा होती.. मागलं सारं काही विसरून ते इथं कायमहि राहू शकले असते आणि ते सुद्धा




काही न कळता. आम्ही हे आमचं राज्यहि त्यांना उपभोगायला दिलं असतं.. त्या दुष्ट सुयोधनाच्या कपटी योजना आणि भाऊबंदकी यातून मुक्त होऊन त्यांना इथं सुखानं कालक्रमण करता आलं असतं नि आपणहि त्यांना काही कमी पडू दिलं नसतं... शिवाय हस्तिनापूरच्या वैभवावरील हक्क शाबीत करताना सोसाव्या लागणाऱ्या मानापमानातूनहि त्यांची सुटका झाली असती... पांडवाची पत्नी जी द्रौपदी.. तिला वनवासात सोसाव्या लागलेल्या दु:खाची आठवण होताच माझा जीव गलबलतो... गरीब बिचारी... जंगलात भटकणाऱ्या पंडुपुत्रांची राणी.. तिनं हे सारे हाल कसे सहन केले असतील? ताई, अभिमन्यूच्या शोधाच्या मिषानं त्याच्या वडिलांना व तिला जर मी शोधून काढून इथं आणलं... तर तिचं यापुढलं आयुष्य तरी सुखाचं होईल...केवळ तिचंच दु:ख कमी व्हावं म्हणून नव्हे तर तिच्या पतींना आणि तुलाहि सुख लाभावं म्हणून अभिमन्यूच्या शोधार्थ मी कां जाऊ नये? (पुन्हा उठत) ताई, तू हो म्हणायचा अवकाश की मी निघालोच.

**सु:**– दादा, असं काही केलेलं मला नाही आवडायचं.. तुला विश्रांतीची फार गरज आहे.. तुझ्या सेवेला सिद्ध असणाऱ्या या सेवकांकडून सेवा करून घे.. नेहमीप्रमाणं याही वेळेला माझ्या कितीतरी नव्या दासी तुझी सेवाचाकरी करण्यास उत्सुक आहेत. मला तुझ्या हृदयात बदल करता येत नसला तरी तुझं मन थोडं फार का होईना मी वळवू शकेन असं मला अजूनहि वाटतं.. या दासींपैकी तुझ्या इच्छेला येईल त्या कोणत्याहि दासीकडून तू सेवा करून घे.. लग्न कर.. आणि उरलेलं सारं आयुष्य इथंच स्थायिक होऊन सुखासमाधानात घालव.. माझी खात्री आहे की तू जर माझं ऐकलंस तर या राज्यातल्या सगळ्यानाच मोठा आनंद होईल.. दादा, त्यांच्या सुखाचा, समाधानाचा तू विचार करायला हवास.. तू लग्न करावं ही तुझ्या प्रजेची इच्छा आहे, हे तू विसरू नकोस. माझ्या दासीवर्गात सध्या अशी एक सुंदरी आहे, की ती तुला अगदी योग्य आहे.. माझं तर तिच्याकडं अगदी बारीक लक्ष आहे. ती एखाद्या मोठ्या राजाच्या पोटीच जन्माला यायची पण बिचारीच्या दुर्दैवानं तिला माझं दास्यकर्म स्वीकारावं लागलेलं दिसतं. यापुढं तुला ती दिसेलच म्हणा... तुझ्या सेवेसाठी मी तिचीच योजना केली आहे. (जवळच उभ्या असलेल्या सैरंध्रीला उद्देशून) सैरंध्री, दादासाठी चांगलं मद्य घेऊन ये आणि हे पहा त्याला काय हवं नको याकडं जातीनं लक्ष पुरव. (सैरंध्री वाकून नमस्कार करते, बाहेर जाते व थोडयाच वेळात सुरापात्र घेऊन प्रवेश करते.)

**की:**– (मोठमोठयाने हंसत) ताई, तुझ्या मूर्खपणाची मात्र आता कमाल झाली! ज्या कीचकाचा पराक्रम, मन आणि हृदय अजिंक्य आहे त्याला हजारो राजकन्यांचा वृंदहि वश करू शकणार नाही.. ताई, तुझा स्वभाव भारीच हट्टी आहे. परंतु शेवटी तुझ्या पदरी निराशाच येणार – माझी खात्री आहे. अभिमन्यु हा पति मिळून उत्तरा सुखी होवो अशी इच्छा प्रकट करून मी या सुरेचे स्वागत करतो... मला आणखी थोडी हवी आहे.. मी तिचं कल्याण चिंतितो.

[ सुदेष्णा सैरंध्रीकडे अशा विशिष्ट रीतीने पहाते की तिला सुरापात्र घेऊन कीचकाजवळ जाणे भागच पडते.. तिच्या हातातील सुरापात्र घेण्यासाठी कीचक उजवा हात पुढे करतो, याही वेळेला त्याच्या हाती सुरापात्र देताना तिचा हात थरथरतो आणि ते घेताना जमिनीवरील गालिचावर थोडे मद्य सांडते. कीचक तिच्याकडे बघतो, तेव्हा आपोआप त्याचा डावा हात हृदयाकडे वळतो. एक विचित्र भावना मनात तरळून जाते. तो किंचित् धापा टाकतो. स्वत:ला सावरत सैरंध्रीकडे वळून).. पुन्हा तूच... ताईनं आता जिची स्तुति केली ती तूच का? तुला पहिल्यांदा पाह्यलं तेव्हा जो अनुभव आला त्याचीच पुनरावृत्ति कां व्हावी बरं? (तो बोलत असताना सैरंध्रीचे सारे शरीर कापत असते, ते पाहून) तुला भीति वाटते?.. पण भीति कसली? मनातच काही तरी सलत असेल. पण असं कां सलावं?.. कीचकाची तुला भीति वाटावी? अरे हो. तू इथं नुकतीच आली आहेस नाही का? विसरलोच मी.. भिऊ नकोस, असा थरकाप होऊ देऊ नकोस... ताईच्या आज्ञेनुसार माझी सेवा करणाऱ्या कोणत्याहि स्त्रीची .. कीचकापासूनच काय पण या राज्यातील कोणाकडूनहि अयोग्य संभावना होणार नाही अशी मी खात्री करून दिलीच पाहिजे! तू माझी सेवा करावी अशी आमच्या ताईची इच्छा आहे. शिवाय तू तिला फार आवडतेस, तेव्हा स्वामिनीची इच्छा पूर्ण करण्यासाठी तुला हा त्रास घ्यावा लागणार.. परंतु तू कसलीच भीति बाळगू नकोस... आमची ताई तर माझ्यासाठी कोणतीहि गोष्ट करताना फारच विचारपूर्वक करते.. जिच्या

(अनर्थसंकल्पमाला)

**वातानुकूलित प्रवास-दर वाढले !**



**मंत्री : बाकी बरंच झालं दरवाढ झाली ते – आता आम्ही आणि तुम्हीच फक्त येथे बसणार हा : हा : हा : !**

सौंदर्याविषयी ताई मला खूप सांगत होती, ती तूच अप्सरातुल्य राजकन्या.. ताई, आजच आपण एक दिव्य नाट्याचार्य पाहिले आणि आता ही दुसरी दिव्यांगना माझ्या सेवेला सिद्ध केलीस.. आज हा इथं एवढा अप्सरांचा समुदाय.. तिकडे त्यांचं नृत्य चाललं आहे... इकडे सुरापान चालू आहे.. स्वारीहून आल्यास मी पाहतो आहे.. बरेच अनोळखी चेहरे दिसू लागले आहेत इथं. सर्वांचे स्वागत असो.

[यावेळी सुदेष्णा नृत्यालयाच्या एका भागात मुलाना नृत्य शिकवणाऱ्या बृहन्नलाकडे जाते. सैरंध्रीही बृहन्नलाकडे मोठ्या तल्लीनतेने बघत आहे, तिला तिच्या आजुबाजूला काय चालले आहे याचे भान राहिलेले नाही, ही गोष्ट कीचकाच्या लक्षात येते. सैरंध्रीकडे वळून–] हे फारच चांगले नर्तक आहेत नाही? [एखाद्या स्वप्नातून जाग यावी त्याप्रमाणे सैरंध्री भानावर येते. कीचकाकडे आपले रागीट कटाक्ष टाकून ती आपले तोंड झटकन् वळवते तेव्हा काही तरी आपल्या मनावर झेपावत आहे असा कीचकाला भास होऊन त्याचा डावा हात आपोआप हृदयाकडे जातो) [स्वतःशीच] किती विचित्र! आजच मला पूर्वीची अनेक स्वप्न कां दिसावी?.. या दासीत नि द्रौपदीत केवढं विलक्षण साम्य आहे! ... आणि हे सारं आत्ताच कां दिसावं? मला विश्रांतीची जरूर असताना.. ह्या गोष्टी आत्ताच कां ? आजच कां? ह्या क्षणीच... (दूर नजर लावून सुरापात्र रिकामे करतो, व तसे करत असताना स्वतःशीच 'आजच कां.. आत्तांच कां..' या क्षणीच कां' हे शब्द सावकाश म्हणत आहे. तो गालिचावर सावकाशपणे लवंडतो. सुदेष्णा जवळ येते व प्रेमळपणाने त्याला स्पर्श करते. तेव्हा कीचक डोळे उघडून एक दीर्घ निश्वास टाकतो...] ताई, मी फार दमलो आहे.. आपण सगळे जण आता जाऊ या! [काही तरी आठवल्यासारखं करून मोठ्याने] बृ–ह–न्न–ला! कीचकाच्या जागी त्याच्या सारखाच दुसरा निष्णात नाट्याचार्य या देशाला लाभला हे पाहून मला मोठा आनंद होत आहे.. मला वाटतं आज एवढं पुरे.. बृहन्नल! तुम्ही सुद्धा थकला असाल.. जा विश्रांति घ्या.. मुलांनो, तुम्हीही आता विश्रांति घ्या.. आज दिलेले पाठ उद्या गिरवा.. प्रतिहारी, मला पूर्ण विश्रांति हवी आहे...

[नृत्यालय हळुहळू रिकामे होते. कीचक गालिचावर एकटाच बसला असून त्याचा श्वासोच्छ्वास जोराने चालू आहे.]

विझलेल्या ठिणगीतून नवी ज्योत प्रकट व्हावी याचं मोठं आश्चर्य वाटतं. . आणि तीहि आजच, आत्ताच– माझी प्राणज्योत बाहेर जाण्याच्या तयारीत असताना.. जेव्हा माझ्यापुढं सारं आयुष्य उभं होतं... मृत्यूशी सामना करण्याची माझ्यात धमक होती.. हो, आता माझं वय होत चाललं आहे.. मला आता चिरकालीन–अंतिम.. विश्रांतीचीच जरूर आहे...

[तो मागे कोसळतो नि त्याचे मस्तक जमिनीला टेकते प्रेक्षकाना ऐकू जाईल इतक्या मोठ्याने तो एक दीर्घ श्वास सोडतो आणि डोळे मिटतो. सावकाश पडदा खाली येतो.]

**[क्रमशः]**



अनुक्रमणिका








## सवाई कालिदास !

कंपनीचे म्यानेजरः—वः, फार छान ! तुमच्या नाटकातले काही काही प्रवेश तर प्रत्यक्ष कालिदासाला देखील लिहिता आले नसते!

नाटककर्ते रावः—छे, छे, आपण फार स्तुति करीत आह त–

म्यानेजरः—नाहीतर काय? अहो तो आगगाडीच्या टक-रेचा सीन कालिदासाला कधीतरी सुचला असता का ?

☆ ☆

## सबसे बडा गद्धा !

एकदा रावसाहेब मामलेदारांच्या कोर्टात एका मुकदम्यात दोन्ही पक्षाचे वकील अगदी हातघाईवर आले. भांडता भांडता आरोपीतर्फेचे वकील रागाच्या भरात म्हणाले, "तुमच्यासारखा बडा गद्धा आजपर्यंत मी काही पाहिला नाही !"

रावसाहेब (मध्येच):—हां हां, मी इथे आहे हे तुमच्या लक्षात नाही वाटते?

☆ ☆

## रेल्वे मंत्रीच होण्यास योग्य !

म्यानेजरः– (एडिटरला) आपले ते नवीन शामराव रिपो-र्टर मोठे हुषार आहेत बरे का? त्यांना आपण आता कायम करा!

एडिटरः—काय म्हणता? मला तर तो अगदीच टाकाऊ वाटतो!

म्यानेजरः—छे छे ! तो तर एक 'जीनीअस' आहे! काल रेल्वे लाईनीवरचे रूळ मोडलेले त्याने पाहिले मात्र आणि तेथे आगगाडी येऊन अपघात होऊन ती वेडीवाकडी आदळण्यापर्यंत सतत आठ घंटे तो एका दगडावर बसून होता ! त्याने आणलेला अपघाताचा रिपोर्ट दाखविला ना मला त्याने !

☆ ☆

## छडी लागे छम् छम !

डॉक्टरः—हं बाळ, तुझी जीभ बाहेर काढ पाहू जरा.

बाळः—नको बुवा–काल मास्तरांपुढे मी जीभ काढली अन् त्याबद्दल त्यानी मला पांच छडया लगावल्या. अजून माझा हात दुखतो आहे!

☆ ☆

## मालती–माधव

मालतीः—कसला एवढा विचार चालला आहे ?

माधवः— तू करते आहेस तोच!

मालतीः—अय्या! सासूबाई पाहतील! मी जातेच कशी!

☆ ☆

## 'स्त्री'मंत

बापः— तुझे ते मधुकरराव कितीसे श्रीमंत आहेत ?

मुलगीः— अय्याऽ! केवढे तरी श्रीमंत आहेत. दिसायला किती छान आहेत आणि अन्तःकरणाचे तर इतके श्रीमंत आहेत—




चुरचुरीत, खुसखुशीत आणि खमंग फरसाण

● ● ● ● ● ● ● ● ● ● ● ● ● ● ●

बापः— अन्तःकरण राहू दे–त्याचे बँकेत किती पैसे आहेत?

मुलगीः— (हलक्या स्वरात ) बँकेत नाहीत बाबा–पोस्टात काल अकरा रुपये सहा आणे होते असे मला म्हणाले!

☆ ☆

## 'गाढव' गणपतराव !

नवीनच घेतलेल्या मोटारीला एका रस्त्यात अपघात होऊन गणपतरावाना जवळच्या एका डॉक्टराकडे नेण्यात आले.

"मला काहीच इलाज करता येण्यासारखा नाही. मी जनाव-रांचा डॉक्टर आहे." डॉक्टर म्हणाला. गणपतराव कुथत म्हणाले, "मग तुम्हीच उपयोगी पडाल. ड्रायव्हर घेतल्याशिवाय नवीन मोटर बाहेर काढायला मी अगदी गाढवच होतो नाही का ?

☆ ☆

## मग घाला गोळी !

'ए मरणाला तयार हो ! मी तुला आता गोळी घालून ठार मारणार आहे.'

"कां?"

'माझ्यासारखा जो मनुष्य दिसेल त्याला गोळी घालून ठार करायचे असा माझा नियम आहे.'

'मी तुझ्यासारखा दिसतो का?'

'होय—अगदी माझ्यासारखा'

'तर मग खुशाल गोळी घाल!'

☆ ☆

## वाऽवा, काय पण काटकसर !

"काय हो कमलाबाई–स्वयंपाकीण काढून टाकल्यापासून खर्च काही कमी झाल्यासारखा वाटतो की नाही?"

"असं का विमलाबाई—झाला ना! हल्ली पूर्वीच्या निम्म्या-नंच जेवण लागत 'स्वारीला'!"

—के. टी. देशमुख










लाटांमागून लाटा याव्यात, तसं शीख सैन्य सम्राट शहाजहाँच्या सैन्यावर तुटून पडले. इतक्या दिवसांच्या वैराचा एकदा सोक्षमोक्ष कायमचाच लावावयाचा असे ठरवूनच दोन्ही सैन्ये एकमेकाना भिडली. तरवारी व तोफांच्या आवाजाने तो निर्धार व्यक्त होत होता.

# मु | लु | खा | वे | ग | ळा

–दिवाकर बापट



**दिवस** चांगलाच वर आला होता. अन् लाटांमागून लाटा याव्यात, तसं शीख सैन्य मोगल सम्राट शहेन्‌शहा शहाजहाँच्या सैन्यावर तुटून पडले. इतके दिवसांचे वैर एकदा सोक्षमोक्ष लावून कायमचे मिट-वून टाकावयाचे, असे ठरवूनच दोन्ही सैन्ये एकमेकाला भिडली. तलवारीचा खणखणाट झाला. तोफांचे कानठळ्या उठविणारे आवाज वातावरणात भरून राहिले. दोन्हीकडील स्वारांच्या मांडीखाली असलेल्या खिकाळणाऱ्या–फुरफुरणाऱ्या घोड्यांच्या टापा टपापत होत्या. त्या बेबंद, बेताल अन् बेहोष टापांखाली जीव अन् जीवाणु, झाडे अन् झुडुपे तुडविली–चिरडली जात होती. हंबरडे अन् किकाळ्या फुटत होत्या. नि त्या भयंकर कर्कश गर्जनांनी दिशा तडकल्या होत्या. घोड्यांच्या पावलांनी उठलेल्या धुळीच्या लोटामुळे चारी दिशा अंधारून आल्या होत्या.

शीखांच्या अफाट सामर्थ्यापुढे शहेन्‌शहाँच्या सैन्याचे सामर्थ्य तोकडे पडत होते. प्रयत्नांची शर्थ करूनहि त्या अचानक झालेल्या प्रखर हल्ल्यापुढे टिकाव न लागून त्याने माघार घ्यावयास सुरुवात केली.

मोंगल सैन्याच्या अग्रभागी हत्तीवर बसलेला शहाजहाँ रडारड, टाहो नि किकाळ्या ह्यानी कोंदलेल्या चारी दिशा उघड्या डोळ्यानी पहात होता. आपल्या माघार घेणाऱ्या सैन्याला पुन्हा रणाभिमुख कसे करावे, ह्याचा विचार करण्यात त्याचे मन घोटाळले होते. पण मनाचा कसलाच ठाम विचार होत नव्हता.

शत्रू क्षणक्षणाला पुढे सरकत होता. छातीला येऊन शत्रू केव्हा भिडेल, हे सांगता येणार नाही, हे लक्षात यावयास शहाजहाँला फार वेळ लागला






नाही. क्षणाचाहि विलंब न लाविता सम्राटाने माहूताला हुकूम सोडिला,

"हाथी पिछे फिराव".

माहूताने चटकन् हुकूमाची तामिली केली अन् उलटया दिशेने तोंड करून हत्ती झपाटयाने चालू लागला. सम्राटाच्या मागे फिरलेल्या हत्तीकडे पाहताच शहेन्शहाँच्या सैन्यात आणखीनच घबराट निर्माण झाली अन् ते अधिकच सैरभैर झाले. वाट फुटेल तिकडे धावू लागले. पुन्हा एकदा त्या अस्ताव्यस्त पळणाऱ्या सैन्यामुळे धुरोळा उडाला अन् सारे आसमंत धूसर झाले.

त्या धूसर वातावरणातूनहि झपाटयाने वाट काढीत एक तरणाबांड घोडेस्वार मोगल सम्राट शहाजहाँच्या हत्तीपुढे येऊन उभा राहीला. डोळयाचे पाते लवते न लवते तोच त्या घोडेस्वाराने आपल्याजवळचा चाबूक हातात घेतला अन् सपासप् त्याने हत्तीच्या गंडस्थळावर चाबकाचे तीन-चार वार केले. अन् रागाच्या भरात दोन-चार इरसाल शिव्या हांसडून त्याने म्हटले, "अरे, बादशहा ना तू? असा भेकडासारखा रणातून पळतोस काय? जे पळून जातात, त्यांना जाऊ दे. पण लक्षात ठेव. तुला दिल्लीवर राज्य करावयाचे आहे. तू परत फिर. तुझी अक्कल तुला ह्यावेळी सोडून गेली तर फार नुकसान होईल. फार!"

शहेन्शहा शहाजहाँने बसल्या जागेवरून किंचित् खाली वाकून त्या तरण्याबांड घोडेस्वाराकडे पाहिले. उडालेल्या धुरोळयामुळे धुरकट झालेल्या वातावरणात त्याचा पुसटसा चेहरा त्याच्या डोळयांनी साठवून घेतला. वयाने फार तर विशीच्या आतील असलेल्या त्या घोडेस्वाराच्या ओठांवर कोवळया मिसरूडांचा काळा रंग अजून फाकला नव्हता. गौरवर्णाची, सडसडीत पण पिळदार अंगलटीची, रेखीव चेहऱ्याची ती मूर्ति पाहता पाहता शहाजहाँ चांगलाच भानावर आला. कसदार आवाजात त्याने माहूताला हत्ती पुन्हा रणात नेण्याची सूचना केली.

काही क्षणापूर्वी रणांगणातून माघारा वळलेल्या शहाजहांचा हत्ती आता पुन्हा रणाकडे वळला. अन् वेगाने चालू लागला. 'मारायचे किंवा मरायचे,' या जिद्दीने सम्राटाने आपली नंगी तलवार परजली.

वेगाने रणाच्या दिशेने जाणाऱ्या सम्राटाच्या हत्तीला पाहून मोंगल सैन्याला जोर चढला. माघार घेत चाललेले ते सैन्य नवा हुरूप चढून पुढे सरसावले. एका अनामिक प्रेरणेने नि जिद्दीने त्या सैन्याने शीख सैनिकांच्या अफाट सामर्थ्याशी यशस्वी झुंज दिली.

☆☆

संध्याकाळचा गार वारा सुटला होता. थकली भागलेली फौज राहुटयांतून विसावली होती. काही राहुटयातून जखमी लोकांवर उपचार चालू होते. मोगल सम्राट शहेन्शहा शहजहाँ आपल्या डेऱ्यात बसून विचार करीत होता. त्याच्या डाव्या अन् उजव्या बाजूला त्याची सरदार मंडळी आपापल्या दर्जाप्रमाणे बसून होती. शहेन्शहाच्या मुखातून परवलीचा पहिला शब्द कोणता येतो, ह्याची आतुरतेने वाट पहात खालच्या मऊ रुजाम्याच्या गालिच्याशी त्यांचा चाळा चालू होता.

क्षणामागून क्षण जात होते अन् मधेच शहाजहाँने दूर लाविलेली आपली नजर डेऱ्यात हजर असलेल्या सरदार-मंडळींकडे वळविली. प्रत्येकाकडे नीट निरखून पहात त्याने म्हटले,

"उस आदमी को देखना चाहता हूँ जिसने ऐसे नाजूक वक्त पर खरीखरी बातें सुनायीं। उसके लफ्ज़ोनेही मुझे सँभाला है।"

सरदार मंडळी क्षणभर विचारात पडली. "हे कसे शक्य आहे? कुठून हुडकून काढणार त्या माणसाला? तो कोण होता, कुठला होता, याचा पत्ता तरी कसा लागावा? छे..छे..."

मनाचा थोडासा हिय्या करून एका सरदाराने म्हटले, "हुजूर, लेकिन् उसका पता कैसे चले? कुछ समझमे..."

"ठीक है! ठीक हे तुम्हारा कहना" शहाजहाँने त्याला मधेच तोडून टाकीत म्हटले. "मगर इसको भी इलाज है!"

"इलाज? कोनसा इलाज?"

शहाजहाँने बघितले. सारे आश्चर्यात बुडून गेले होते!

"अगर एक बार वह मेरी आँखोंके सामने आ जायें, तो लाख आदमियोंमेंसे भी मैं उसे पहचान सकूंगा!"

शहाजहाँने आत्मविश्वासपूर्वक घोषणा केली.

"ठीक है हुजूर! ऐसा ही कुछ इंतजाम हो जाना चाहिये!" शहाजहाँच्या आत्मविश्वासाची दखल घेत सरदार-मंडळीनी सम्राटाची कल्पना उचलून धरली.

सम्राट शहाजहाँचा निरोप घेऊन सरदारमंडळी डेऱ्यातून बाहेर पडली तेव्हा त्यांच्या मनात एक पक्की योजना तयार झाली होती. "लहान पोरापासून थोरापर्यंत जेव्हढी म्हणून माणसे ह्या युद्धात सामील झालेली आहेत; त्यांना उद्या सकाळी बादशहासमोर हजर करावयाचे!"

बस्!

☆☆

मोंगल सम्राट शहेन्शहा शहाजहाँ आपल्या नित्याच्या कामातून मोकळा होऊन डेऱ्यात दाखल झाला, तेव्हा नुकतीच कुठे कोवळी किरणे पडली होती. डेऱ्याच्या प्रवेशद्वारावर एक झिरझिरीत पडदा सोडलेला होता. त्या पडद्याच्या किंचित् मागे असलेल्या गादीवर शहाजहाँ लोडाला टेकून बसला होता. हिरव्या मखमलीने आच्छादलेली गादी त्याला सुखवू शकत नव्हती. सम्राटाची तृषार्त नजर समोरच्या झिरझिरीत पडद्यासमोरून सरकणाऱ्या सैनिकांवर झरत होती. येणारा सैनिक एक क्षण पडद्यासमोर उभा राही. आपल्या लाडक्या बादशहाला सलाम करी अन् कळत-नकळत शहाजहाँने नकारात्मक मान हलविली की, पुढे सरके. प्रत्येक नकाराबरोबर बादशहाच्या डोळयात निराशेची एक छटा चमकू लागली अन् बघता बघता अगदी थोडयाच वेळात ती गहिरीहि झाली.








सूर्य झर्झर् वर येत होता. पण सम्राटाला आशेचा किरण दिसत नव्हता. बसल्या जागेवरून पडद्यासमोरून जाणाऱ्या सैनिकांचे मुजरे स्वीकारता स्वीकारता शहाजहाँला कंटाळा येऊ लागला. बसल्या-जागी त्याची हळुहळु चूळबुळ सुरू झाली. पण मनाच्या अस्वस्थ अवस्थेत तसे बसून राहण्याखेरीज त्याला गत्यंतर नव्हते!

अन् अचानक तो गौरवर्णाचा, सडसडीत पण पिळदार अंगलटीचा, रेखीव चेहऱ्याचा, तरणाबांड घोडेस्वार डेऱ्याच्या झिरझिरीत पडद्यासमोर येऊन उभा राहिला. आपल्या शांत अन् तेजस्वी डोळ्यांनी त्याने एकदा शहाजहाँकडे पाहिले अन् झटकन् खाली वाकून त्याने बादशहाला लवून मुजरा केला. क्षणभर त्याच्या सहजसुंदर हालचालीकडे पहात शहाजहाँ लोडाला टेकून तसाच बसून राहिला. अन् मग कुणाला लक्षात येण्याच्या आत उठला. डेऱ्याच्या प्रवेशद्वारावरील झिरझिरीत पडदा घाईगर्दीने बाजूला सारून सम्राट शहाजहाँ त्या तरण्याबांड घोडेस्वारापुढे येऊन उभा राहिला. त्याचे रुपडे डोळ्यात साठवून घेता घेता शहाजहाँचे डोळे लकाकले. चेहरा आनंदाने चमकू लागला. मन उल्हासाने नाचू लागले.

मनाच्या उल्हसित अवस्थेत शहाजहान् त्याच्या जवळ आला. आपल्या मजबूत, ऊबदार पंज्यांनी त्याने त्या तरुणाचे खांदे घट्ट पकडले. आपल्या धारदार नजरेने त्याने त्या युवकाच्या नजरेत खोलवर पाहिले. अविचल उभा राहून तो तरणाबांड सम्राटाच्या साऱ्या हालचाली डोळ्यात साठवीत होता.

"तुझे नांव?"

शहाजहाँच्या त्या दोनच शब्दात जिव्हाळा, प्रेम नि सहानुभूति ह्यांचे विलक्षण मिश्रण चमकून गेले. तो तरणाबांड जीव त्या जाणीवेने भलताच शहारला. मोहोरला.

बादशहाच्या नजरेला नजर देत त्याने किंचित् दबल्या आवाजात म्हटले. "खाविंद, माझे नांव रघुनाथसिंह. मेरठच्या राठोडाचा मी धाकटा मुलगा. बापाबरोबर भांडण झाले, म्हणून..."

खरं म्हणजे एका दमात रघुनाथसिंहाला स्वतःविषयीची खूपशी माहिती बादशहाला करून द्यावयाची होती. पण तो काय सांगतो, हे ऐकण्याच्या मनःस्थितीत शहाजहाँ होताच कुठे?

त्याच्या बोलण्याकडे दुर्लक्ष करीत शहाजहाँने प्रश्न केला, "क्यों रघुनाथसिंह, कल हाथीके माथेपर तुमनेहि चाबूक मारा था?"

"जी, खाविंद!"

हात जोडून रघुनाथसिंहाने कबुली दिली.

"साथ साथ तुमने मुझे गालियाँ भी दी थी!"

शहाजहाँने दुसरा प्रश्न केला.

बादशहाच्या त्या प्रश्नाने रघुनाथसिंहाचे मन घायाळ झाले. अस्वस्थ झाले. "पण अखेर ही चवकशी कां? काय साधायचेय् ह्यात बादशहाला? बादशहाला शिव्या देण्यात आपली कसूर तर नक्कीच झालीय्! आता त्याबद्दल त्याची क्षमायाचना करणे, एवढेच आपल्या हाती बाकी राहिले आहे. बादशहा ह्या घोर अपराधाबद्दल आपल्याला माफी देईल का?....

विचाराबरोबर मन हेलकावे खात असताना रघुनाथसिंहाने कशीबशी नजर वर उचलून बादशहाकडे पाहिले. त्याच्या अथांग नजरेत आनंदाच्या सोनेरी रेषेखेरीज रघुनाथसिंहाला दुसरे काहीच दिसले नाही. बादशहाच्या त्या नजरेची दखल घेता घेता रघुनाथसिंहाचे मन पुन्हा हेलकावे खाऊ लागले. त्याच्या मनात आले, "छे. छे. हे सारेच विचित्र दिसतेय! आपण शिव्या दिल्या, ह्याची चवकशी करीत असताना बादशहाला आनंद तरी कसला झाला आहे? वरकरणी आनंद झाल्याचे नाटक करून..."

मनाच्या दोलायमान् अवस्थेत उभ्या असलेल्या रघुनाथसिंहाने हलकेच आपली नजर भुईकडे वळविली. काही न सुचून त्याने पायाच्या अंगठ्याने भुईशी चाळा करावयास सुरुवात केली. बादशहाच्या मजबूत-ऊबदार पंज्यांची आपल्या खांद्यावरील पकड जराहि ढिली झाली नसल्याची जाणीव त्याला होत होती.

दबल्या आवाजात रघुनाथसिंहाने हलकेच म्हटले, "खाविंद, कसूर माफ हो! वह समय ऐसा ही था-मुझे होश तो बिल्कुल नही रहा!"

बादशहा प्रसन्नपणे हसला. रघुनाथसिंहाने चमकून वर पाहिले. कशी कुणास ठाऊक! त्याला प्रकर्षाने एक गोष्ट जाणवू लागली. बादशहाच्या मुखावरील आनंदाची छटा काही आगळीच दिसतेय....

"घबराओ नही बेटा." शहाजहाँने त्याचे खांदे घुसळीत म्हटले. "आज मैं वो गालियाँ ज्यों कि त्यों तुम्हारे मुंहसे फिर सुनना चाहता हूं!"

बादशहाची मागणी विलक्षण होती. ती मंजूर करणे रघुनाथसिंहाच्या आंवाक्याबाहेरचे होते. मनाच्या विचित्र अवस्थेत बादशहाच्या मुखाकडे पहात तो किती वेळ तरी तसाच उभा राहिला.

अन् मग खूप वेळानंतर रघुनाथसिंह भानावर आला. त्याने स्वतःला सांवरले.

"जहाँपनाह, वह वक्तही ऐसा था। क्या जाने कैसे जुबानसे निकल गया। खता माफ हो जायें।"

बादशहाची आर्जवे करता करता रघुनाथसिंहाच्या चेहऱ्यावर अजीजी अन् लाचारी ह्यांचे विलक्षण मिश्रण भरून पसरून राहिले. डोळ्यांनी त्याची दाद घेताना बादशहाला मोठी गंमत वाटली. 'रघुनाथसिंहाला आपल्या मनाचा अजून पुरता थांग लागू नये,' ह्याचे त्याला राहून राहून नवल वाटू लागले.

पण नुसते नवल करीत राहून वेळ घालवीत बसण्याइतकी ताकद बादशहाच्या मनात आता राहिली नव्हती. त्याला हवा होता तो माणूस त्याच्या पुढ्यात उभा होता. अन् त्या माणसाच्या तोंडून त्याला ऐकावयाच्या होत्या त्या त्याने काल रणांगणावर आपल्याला हांसडलेल्या शिव्या! फक्त शिव्या! दूसरे काही नाही.

त्या शिव्या ऐकण्यासाठी बादशहाचे मन अधीर झाले होते. म्हणूनच की काय, त्याने दमदार आवाजात हुकूम सोडला, "नही, मैं दुसरा कुछ नहीं सुनना चाहता हूं। बस् वही गालियाँ मैं दुबार सुनना चाहता हूं। वही गालियोंने मुझे फतेह दिलाई है। डरो मत, वोही लहजा भी वोलो।"

आता मात्र रघुनाथसिंहाचा नाईलाज झाला. त्याने बघितले, 'बादशहाच्या ह्या विचित्र हट्टापुढे आपला निभाव लागणे कठीण आहे. अप्रिय असले तरी पुन्हा त्या शिव्यांचा मुखावाटे उच्चार करणे, आपल्याला भाग आहे."

मनाची अशी खातरजमा करीत रघुनाथसिंहाने हिय्या केला अन् काल रणांगणावर त्या मोक्याच्या प्रसंगी बादशहाला त्याने वाहिलेल्या लाखोलीची सही सही तबकडी त्याने तशीच वाजविली. रघुनाथसिंहाच्या मुखातून पुनरुच्चार होत असलेल्या त्या शिव्या ऐकत असताना तृप्तीने बादशहाने आपले डोळे मिटून घेतले. त्याच्या चेहऱ्यावरील प्रसन्नतेची छटा आता दाट झाली. आनंदाच्या भरात त्याने आपल्या गळ्यातील मोत्यांचा कंठा काढिला अन् रघुनाथसिंहाच्या गळ्यात घातला. मोठ्या अभिमानाने त्याने एकदा रघुनाथसिंहाकडे पाहिले अन् चटकन् पुढे होऊन त्याने त्याला हृदयाशी कवटाळले.

निःशंक प्रसन्नतेने शहाजहाँने त्याच्या पाठीवरून हात फिरवीत म्हटले, "तू तो मेरे कलिजे से कुछ ज्यादा है!"

बादशहाच्या दृढ आलिंगनात विसावलेल्या रघुनाथसिंहाचे डोळे आनंदाश्रूंनी भरून आले. कृतकृत्यतेने त्याने आपले मस्तक बादशहाच्या खांद्यावर विसावले!

●●●



# अं | त | र

सौ. निर्मला मोने

**रस्त्याच्या** वळणावर इतक्या अचानकपणे ती दोघं समोर आली की एकमेकाला चुकविण्याची संधीच मिळाली नाही.

हे असं भेटण्याची ही पहिलीच वेळ. लग्नविच्छेद मिळाल्यापासून जवळ जवळ पुरे तीन महिने ती घराबाहेर पडली नाही. अन् मग नंतर कारणपरत्वे हळूहळू बाहेर पडणं भाग पडलं. तरी जगाच्या नजरा स्वतःवर खिळल्या असाव्यात या जाणीवेनं कॉन्शस होऊनच. तरीसुद्धा आज असं भेटण्यापूर्वी चांगलं दोन वेळा तिनं त्याला पाहिलंय् समोरून येताना. पण त्याला भेटण्याची कल्पनाही सहन न होऊन तिनं त्यावेळी आधीच तो रस्ता, निदान फुटपाथ, बदलला होता आणि काहीच न झाल्यासारखं भासवीत धडधडत्या हृदयानं एक डोळा त्याच्यावर ठेवून तिनं थरथरत्या पावलांना गति दिली होती. त्यानं तिला तेव्हा तेव्हा पाहिलं होतं की नाही कुणास ठाऊक, पण असलं तरी तो तमाच निर्विकार राहिला होता.... कदाचित् पाहिलं नसेल्ही !

"कुठं ? कॉलेजला ?"... बोलणं भागच आहे म्हणून एक उगीचच निरर्थक प्रश्न. (अर्थात् त्याच्याकडून.)

"हो". त्याहूनहीं तुटक उत्तर...पुनः शांतता.

रस्ता ओलांडून जाण्यासाठी दोघंही खोळंबून उभी आहेत. पण अजून समोरचा हिरवा दिवा लागला नाही. थांबावं लागलंय्, उशीर होतोय... हे खरं. ज्या विलक्षण मनःस्थितीत दोघं शेजारी उभी आहेत तिचा ताणही काही कमी जाणवत नाही पण तरीही हे थांबणं नकोसं वाटत नाही. (हे नवलच).

समोरचा दिवा रंग बदलतो आणि चावी दिल्यासारखा माणसांचा लोंढा

एक लांबलचक झुरका घेऊन सगळीच्या सगळी सिगरेट तो बुटाखाली ठेचतो, नि पायरी उतरतो. तेथे घुटमळणारे कुत्रं त्याच्या पायाशी येतं. बुटाची एक सणसणीत ठोकर त्याच्या पोटात बसते. ते केकाटत कोलमडत जातं. दातओठ खाऊन तो पुटपुटतो, 'द बिच....








रस्ता ओलांडू लागतो. ती अजून तिथेच. तशीच. भांबावलेली, हरवलेली.

तो क्षणभर वाट पहात थांबतो आणि मग अभावितपणेच तिचा दंड धरतो. . . . बरोबर चालवतो. ती भानावर आली आहे. तिच्या अंगावर झर्रकन् उमटून गेलेला शहारा त्या तसल्या घाईगर्दीतही त्याला जाणवतो, अस्वस्थ करतो. तिरप्या नजरेनं तो तिची प्रतिक्रिया अजमावू लागतो. ती मात्र शहारूनसुद्धा हात सोडवून घेण्याचा प्रयत्न करीत नाही.

रस्ता ओलांडल्यावर तो थोडा घुटमळतो. तिची नजर टाळून, अर्धवट तिला उद्देशून, अर्धवट स्वतःशी पुटपुटतो, "आत्ता वेळ काढता येईल थोडा ?"

"अं ? आत्तां ? कशासाठी ?" स्वरात कुतूहल आणि बेफिकीरपणाचं जाणवेलसं उद्दाम मिश्रण.

"असंच. . जरा. . . ऊन काय तापलंय, चल ना, ड्रिंक घेऊं." त्याचा स्वर अधिकच आर्जवी आणि थोडा ओशाळलेलाही.

ती स्तब्धच.

'चल ना जरा, थोडं बोलायचंय . येतेस?" तिच्याशी बोलताना स्वरात सवयीनं येणाऱ्या अजिजीबद्दल तोच चिडलाय् मनोमन. हे नेहमीचच, आणि तिचा उर्मट बेफिकिरपणाही परिचितच.

ती अजून गप्पच. पण शिशासारखी जड झालेली पावलं मात्र समोरच्या कॅफेटेरियाकडे वळतात. तो आपोआपच पुढे होतो, तिचा दंड धरतो. अधिक सराईतपणानं. (आतां मात्र शहारा आला नाही.) तिला आजाऱ्यासारखं चालवतो. खरोखरच तिला आजारी असल्यासारखं झालंय्. मोहनिद्रेत असल्यागत ती त्याच्याबरोबर चालते. ओढत, फरफटत.

कॅफेमधलं कोपऱ्यातलं, किंचित अंधेऱ्या जागेतलं टेबल त्यानं पसंत केलंय. तशी यावेळी तिथं गर्दी मुळीच नाही. उलट आर्त आणि उंच उठणाऱ्या विदेशी सुरांनी अधिकच एकाकी वाटतंय.

'रुह् अफजाह्' च्या नक्षीदार बाटल्या अंगभर दंवाचे थेंब लेवून येतात. चाखत माखत संपवल्या जातात. एकाग्रपणानं जणु एवढंच एक कर्तव्य मनापासून करणं बाकी राहिलं होतं. एकमेकांची एवढीशीही हालचाल टिपण्यासाठी दोघांची शरीरं जणु सहस्राक्ष बनली आहेत.

वेटर एकवार येऊन अबोलपणानंच न्याहाळून जातो. त्याच्या नजरेत निष्कारण कुतूहल ओथंबलेलं. ती नजर सहन न होऊन ती थोडीशी उसळूनच विचारते, "काय बोलायचं होतं ?"

"बोलायचं ? हं हं सांगतो ना !" चोरी करताना पकडला गेल्यासारखा तो गोंधळतो, घुटमळतो, तिच्याकडे रोखून बघतो आणि मग तिची दृष्टि टाळीत, एकवार खाकरून, खालच्या स्वरात पण संथपणानं सांगतो, "मी लग्न करायचं ठरवलंय . . . सुषमेशी. . "

डोक्यावर बॉम्ब पडावा अशी ती हादरून निघते. कड्यावरून कोसळताना चाचपडावं तसे हात आंधळेपणानं आधार शोधतात. अभावितपणे ती टेबलाच्या कडा घट्ट धरून ठेवते. तो पहातोय. तिच्याबद्दलच्या करुणेनं त्याला भरून येतं. . . पूर्वीचा सारा कडवटपणा, द्वेष, मत्सर या वेळेपुरता तरी धुवून गेलाय.

दोन मिनिटांनी सांवरल्यावर काहीच न झाल्यासारखं भासविण्याचा प्रयत्न करीत ती समोरचा पाण्याचा ग्लास उचलून तोंडाला लावते. वाळवंटातून आल्यासारखी घटाघट घोट घेते. पर्समधून रुमाल काढून चेहरा पुसून घेते आणि हंसण्याचा प्रयत्न करीत अस्फुट उद्गारते, "कॉंग्रॅच्युलेशन्स, मेनी हॅपी रिटर्नस्. . ." अचानक गळा रोधल्यासारखा होतो, आवाज बदलतो. टेबलाच्या कडांवरची पकड घट्ट होते.

तो गलबलून गेलाय्, कुठंतरी सुखावलायही. तिच्या हातावर हलकेच थोपटत कुजबुजतो, "तुला दुखविण्यासाठी नाही सांगितलं. पण तरी तुला न कळवणं बरं नाही वाटलं. सांग. तुझी हरकत नाही ना ?"

'आता काय संबंध ? आणि हरकत घेणारी मी कोण ? मी नाही म्हटलं तर हे लग्न व्हायचं रहाणार आहे ? मग नको म्हणून सांगू कां ? हेच सांगायचं होतं असं बोलावून ? सोसलं ते पुरे नाही का झालं ?' प्रश्नांची माळ मुकपणानं तिच्या डोळ्यातून तरळत जाते. तोंड झांकून ती पुटपुटते "नो नो. नॉट ॲट ऑल. सुखी हो."

"उमा, माझं ऐकशील तर तूही तुझा मार्ग निवडावास योग्य साथीदार शोधून." तो हळुवारपणानं पण तिची कीव केल्यागत सुरात कुजबजतो.

आता मात्र तिथं बसणं तिला अशक्य होतं. "ओ. के. निघते मी. उशीर झालाय." ती उठून जाण्यासाठी निघते देखील. . . अन् अचानक पुनः मागे वळते. सर्रकन् पर्स उघडून एक नोट काढून वेटरनं आणून ठेवलेल्या बशीत टाकीत म्हणते, "हे माझं बिल. मोलो कॉन्ट्रिब्युशन प्लीज्" अन् चट्चट सँडल्स वाजवीत निघूनही जाते.

तो तसाच सुन्न. पाठीच्या कण्यातून संतापाची एक तीव्र शिणिक उठून मस्तकात भिनते. दोन भुंवयांमधली जागा चिमटीत धरून तो डोकं झटकतो. तिनं ठेवलेल्या नोटेच्या बारीक चिंध्या करून पायांखाली टाकतो. खिशातून दुसरी एक नोट काढून बशीत ठेवतो, आणि सिगरेट पेटवतो. झटक्यानं उठून हॉटेलच्या बाहेर येतो. कोपऱ्यावर ती उभी आहे. टॅक्सीसाठी. टॅक्सी थांबते आणि डौलात चढून ती दार बंद करून घेते पूर्वीच्याच कुर्ऱ्यानं. टॅक्सी सुरू होते.

हॉटेलच्या पायरीवर तो उभा आहे. एक लांबलचक झुरका घेऊन तो सिगरेट सगळीच्या सगळी बुटाखाली ठेचतो. पायरीशी घुटमळणारं कुत्रं शेपटी हलवीत त्याच्या पायांजवळ येतं. बुटाची एक सणसणीत ठोकर त्याच्या कुशीत हाणीत तो दातओठ खाऊन पुटपुटतो, "द् बिच."

●●●








कै. ज. वि. पेठे
यांच्या संगीतमधुर
स्मृतींचा पुढील भाग



## पं. विष्णु दिगंबर यांनी लावलेले लग्न

**पं.** विष्णु दिगंबर यांच्या समवेत ब्रह्मदेश व सिलोनचा प्रवास करण्याचे भाग्य मला लाभले होते. तो प्रवास आटोपून रंगूनमार्गे परत येताना गुरुमाउलीस एक वेगळीच जबाबदारी पार पाडावी लागली. तेथील मुक्कामात एका गुजराती मुला-मुलीचे लग्न लावण्याचे कार्य त्यांचेवर वधुवरानेच सोपविल्याने त्याना ते पार पाडावे लागले. नि दोन जिवांचे कल्याण साधले.

मुलगा व मुलगी दोघेहि श्रीमंता घरचीच होती. गुजराती समाजातील त्यावेळच्या रूढीनुसार त्यांच्या आईवडिलांनी ती सगाई त्यांच्या बालपणीच केली होती. पुढे मुलाच्या बापाला व्यापारात ठोकर बसून त्याचे दिवाळे निघाले. त्याकारणाने मुलीच्या वडिलांनी त्या मुलाशी आपल्या मुलीचे लग्न करण्यास नकार दिला. पण मुलीचे म्हणणे असे की, माझी सगाई त्यांचेशी झाली आहे. मी त्यांचेशीच लग्न करेन. बापास ते म्हणणे पटेना. मुलगी हट्ट सोडिना. असा हा प्रकार बरेच दिवस चालू होता. त्याच सुमारास गुरुमाउलीचा मुक्काम तेथे पडला. माऊलीची ख्याति ऐकून तो मुलगा व ती मुलगी गुरुजीना येऊन भेटू लागली. तेव्हा गुरुमाउलीनी मध्यस्थी करून मुलीच्या वडिलांना समजावून सांगितले की "तुमच्या कन्येची इच्छा त्याच वराबरोबर विवाहबद्ध होण्याची आहे. वर पण वधूला वाग्दत्त करून घेण्यास तयार आहे. तरी ही क्षुल्लक कारणे सोडून उभयतांच्या मनाप्रमाणे विवाह लावून द्यावा. त्यामुळे दोघेहि सुखी होतील. समजा लग्नानंतर ही गरिबी आली असती, तर तुम्ही काय केले असते ?"

याचा परिणाम कन्येच्या पित्यावर होऊन, त्याने आपल्या कन्येचा विवाह त्याच मुलाशी लावण्याचा निश्चय केला व गुरूमाऊलीस पौरोहित्य करण्याची विनंति केली. माऊलीने विवाह प्रसंगी राम-सीता-विवाहा वेळेच्या चौपाई संगिताने समारंभाची शोभा वाढविली, व वधुवरांस शुभाशिर्वाद देऊन त्याना निरोप दिला.

कन्येच्या पित्याने त्या प्रसंगी आपल्या जावयास भरपूर वरदक्षिणा देऊन, त्याच्या व्यापाराचा जम बसविण्याचे ठरविले, व आपल्या उद्योगातील एक भागीदार पण करून घेतले.

त्यावेळी ब्रह्मदेशातील गुजराती समाजात तो विवाह गाजला होता. विवाहास हजारो मंडळीही उपस्थित होती.

## शेठजींचे आकस्मिक दर्शन

रंगूनच्याच दौऱ्यातील आणखी एक गंमतीदार प्रसंग. ज्या सेठजीनी आमची तेथे उत्तम बडदास्त ठेवली होती, ते स्वतः मात्र तेथे रहात नसत. फार काय, आमची भारताला परत निघण्याची वेळ येईपर्यंतही त्यांचे दर्शन आम्हाला घडलेले नव्हते. आमच्या प्रयाणाला तर फारच थोडे दिवस उरले होते. स्वाभाविकच यजमानाची भेट न होताच परत जावे लागणार अशी चूटपूट लागली होती. दिवस भराभर चालले होते. . .

एके दिवशी दुपारी आम्ही आराम करीत होतो. तोच साठीच्या सुमारीचे एक गृहस्थ अंगात जाळीचा गंजिफ्रॉक, तोही मळकासा, एका हातावर सदरा टाकलेला व डोईला जुनाट मारवाडी पगडी अशा स्वरुपात आले व त्यानी माऊलीच्या खोलीची चौकशी केली. आम्ही पडल्या–पडल्याच त्याना त्या खोलीचा रस्ता दाखविला.

गुरुजी त्यावेळी एकतारी घेऊन नामस्मरणात मग्न होते. त्यानीसुद्धा एकदा सहजच त्या गृहस्थांकडे पाहिले, व डोळे मिटून रामनाम सुरू केले. सुमारे तासाभराने ते गृहस्थ नमस्कार करून जाण्यासाठी उठू लागले. तेव्हा गुरुजींनी नमस्कार करून सहजच त्याना परिचय विचारला. त्यानी परिचय सांगताच, गुरुजीनी हंसतच मोठ्याने राम राम म्हणावयास सुरुवात केली. ती असामी म्हणजेच आमचे त्या वेळचे अन्नदाते होते, असे नंतर आम्हाला समजले मात्र. आम्हाला लाजल्यासारखे झाले. त्यावेळी माझे वय जेमतेम सोळा वर्षांचे असेल. ते सेठ करोडीपति होते असेही ऐकले. पण यातील गंमत तर पुढेच आहे.

रंगूनला गुरुमाऊलीनी एकवीस दिवस रामायणाची संगीत कथा सांगितली. लोकांची तुडुंब गर्दी होत असे. मोठमोठी शेट मंडळी

सहपरिवार पहावयास मिळत. त्यांची श्रीमंति पाहून डोळे दिपून जात.

कथेच्या सांगतेच्या दिवशी कपडालत्ता, फळ–फळावळ, पैसा-अडका यांचा अक्षरश: ढीग पडला. तसे रोजच पुष्कळ मोठ्या स्वरुपात अर्पण होत असे. पण त्या दिवशी तर कळसच झाला. गुरुजींच्या कथेचा थाट, संगिताचा तो निनाद व तो सोहळा ज्यानी प्रत्यक्ष नजरेने पाहिला असेल, त्यानाच याची कल्पना येईल. इतके सगळे होते तरी आमचे अन्नदाते सेठ एक दिवसही रामायणाला हजर नव्हते. की त्यानी एक छदामहि चढवला नव्हता. ते पाहून माऊलीला नाही म्हटले तरी आश्चर्यच वाटले होते.

पुढे त्यांची ती आकस्मिक भेट झाली. त्यावेळी माऊली त्याना म्हणाली, "सेठजी आपण वा आपल्या परिवारापैकी कोणीच कसे कथेला आले नाही ? आपणास व आपल्या परिवारातील मंडळीला आपल्याच निवासस्थानी एक दिवस रामायणाची कथा ऐकविण्याची माझी इच्छा आहे. तेव्हा कधी ते तुम्हीच ठरवा. कारण आम्ही आता रंगून सोडून पुढे जाणार आहोत."

तेव्हा सेठजींना नाही म्हणवेना. अखेर एक दिवस त्यानी आपल्या बंगल्यावर रामायण-कथा ठेवली. बरीच मंडळी निमंत्रित होती. त्यानी विदागी म्हणून माऊलीला १००१ रुपये अर्पण केले.

## कलावंत, हमाल नि हमाली

त्यावेळी लाहोरला मोहरम सुरू होता. तेथील रेडियोवर श्री. नारायणराव व्यास यांच्या गायनाचा कार्यक्रम होता. त्याच वेळी पतियाळाचे छोटे महाराज तेथेच होते. त्यानी श्री. नारायणराव यांचे रेडियोवरील गाणे ऐकले व त्याना फोन करून दुसऱ्या दिवशी आपल्या बंगल्यावर रात्री नउ ते दहापर्यंत कार्यक्रमाचे निमंत्रण दिले.

साथीदारांची व्यवस्था नारायणराव यानाच करावयाची होती. लाहोरला साथीदार-सारंगी–तबलावाले – मियाभाईच असल्याने मोहरम निमित्त ते सर्वच रजेवर होते. काही हिंदू साथीदार होते, त्याना रेडियोने अगोदरच करारबद्ध करून ठेवलेले. त्यामुळे त्याना साथीदार मिळेनात. तेव्हा ते माझ्याकडे आले व म्हणाले, 'पेठे, माझे एवढे काम कराच. तुम्हीच माझ्या साथीला चला. दुसरे कोणीच मिळत नाही व आज काम अगदी अडलेलेच आहे.'

मी फारसा कोणाच्या साथीला जात नसे. कारण माझे ते ध्येय नव्हते. पण अडलेल्या मनुष्यास मदत करावी व त्यातहि नारायण-राव तर काय आपले गुरु बंधूच. मग त्याना नकार कसा देणार ? अनिच्छेनेच का होईना, पण तयार झालो. एका तबलजीची पण व्यवस्था केली. माझ्याकडचेच तंबोरे, तबला–पेटी, तब्बलजी आणि गप्पांसाठी माझे परमस्नेही श्री. वि. म. कुळकर्णी यानाही आग्रहाने घेऊन आम्ही निघालो. दिवस कडाक्याच्या थंडीचे. सूट बूट आणि वरती चेस्टर (गरम ओव्हरकोट) चढवून सर्व जाम्यानिम्यासह आम्ही महाराजांच्या बंगल्यावर पोहोचलो. जाण्यायेण्याची व्यवस्था नारायणराव यांनाच करावयाची होती. भाड्याचे टांगे ठरवून तेथे पोहोचले. आणि परत येताना, टांगे काय मिळतील की, या कल्पनेने टांगेवाल्यांना पैसे देऊन वाटेला लावले.

दिवाणखान्यात म्हणजे एका लहानशा खोलीत एका गादीवर गालिचा टाकून बैठक बनविली होती. समोर एक सोफा-सेट आणि चार-पांच खुर्च्या. सात आठ मंडळी बसतील एवढीच व्यवस्था होती. बस्स्. श्री. कुळकर्णी याना एका खुर्चीवर बसवून मी बैठकीची हत्यारे पाजवीत म्हणजे लावीत बसलो. ९–३० वाजता महाराज आपल्या दोन-तीन मित्रांसह येऊन सोफा-सेटवर बसले. काही बायका-मंडळी आतल्या खोलीत (पड्यात) असल्याचे त्यांच्या मंजुळ हसण्यावरून समजत होते. बाहेर फक्त पांच श्रोते आम्ही तीन साथीदार होतो. महाराज पिऊन तर्रर होऊन आले होते, अर्थात त्यांचे मित्रही. आणि तेथेही ग्लास व बाटल्या तयारच होत्या.

व्यास यानी गाणे सुरू केले. पहिला ख्याल संपल्यानंतर श्री. व्यास यांचेच पण एक ध्वनिमुद्रित गाणे सुनावण्याची फर्माईश केली. नारायणरावानी ते म्हटले. तोच दुसरी फर्माईश. मग नारायणरावानींही पाच पाच मिनिटात एक एक गाणे संपविण्यास सुरवात केली. तर्रर झालेले महाराज वाऽ हऽ वा करीत होते. आणि त्यावर आम्ही आवंढा गिळीत होतो, वाहवा कशाची म्हणून ! तासभर हा असा फार्स झाल्यावर महाराज जेवावयास उठले, व आम्हाला सुट्टी मिळाली. नोकरांनी आमची वाद्ये वगैरे आणून बाहेरच्या व्हरांड्यात ठेवली व दरवाजे बंद करून टाकले.

बंगल्यापासून मोठा रस्ता एक फर्लांग दूर. त्यामुळे दोघाना टांगे आणण्यास पाठविले, आणि कडाक्याच्या थंडीत आम्ही झालेल्या कार्यक्रमाची चर्चा करीत बसलो. बराच वेळ झाला, तरी टांगा येण्याचे लक्षण दिसेना. अकरा वाजले. साडेअकरा झाले. त्या निर्जन भागात भयाण शांतता पसरली होती. काय करावे, हा विचार मनात घोळू लागला. शेवटी सर्वांनी स्वयंसिद्ध होण्याचे ठरविले. एकेकाने एकेक वाद्य बगलेत मारले. मी व कुळकर्णी यानी पेटी उच-लली आणि मध्यरात्री आमची ती मिरवणूक सुरू झाली. त्यावेळी रस्त्यात कोणीच नव्हते, आणि ओळखीचे तर भेटण्याची सुतराम शक्यता नव्हती. तरीहि त्या दोन्ही प्रकारांपैकी एक वा दोन्ही घडणार तर नाहीत ना, अशी पाल चुकचुकत होती. नसता अंधारात गांधर्व महाविद्यालयाचे प्रिन्सिपॉल आणि ऑल इंडिया रिपोर्टरचे संपादक बाजाची पेटी घेऊन कुठे निघाले, या प्रश्नाने भंडावले असते. थोडा वेळ तेथे पुन्हा टांग्याची वाट पाहिली. आमचे बिनीचे शिलेदार तेथेच दात वाजवित उभे होते. थोड्या वेळाने टांगा मिळाला. अवाच्या सवा पैसे कबूल केले. आमची पांच धुडे सवाद्य त्यात सवार झाली आणि मध्यरात्री मुक्कामावर पोहोचलो. तात्पर्य काय गाण्या-साठी पैसे खर्च करणाऱ्या राजाला आम्हाला मोटारीतून पोहोचते करणे काही अशक्य का होते ? पण येणे-जाणे हा भाग श्री. नारायण-राव यांचेकडे सोपवून ते निर्धास्त बनले होते !!






# पेन्सिलीने लाज राखली

माझे वास्तव्य त्यावेळी लाहोर येथे होते. गंधर्व महाविद्यालयाचा प्रमुख म्हणून मी काम करीत होतो. तेव्हा काही समारंभानिमित्त मला संगीताचे कार्यक्रमाकरिता आमंत्रण येत असे.

अशा एका प्रसंगी – लाहोर हायकोर्टाचे न्यायाधीश सर शादीलाल यांच्या कन्येच्या विवाहाचे वेळी–मला कार्यक्रमाचे बोलावणे आले, ते मी स्वीकारले. त्या वेळी पंजाबचे राज्यपाल गव्हर्नर व इतर बडी बडी मंडळी हजर राहणार होती. त्या प्रसंगास उचित, थोडा वेळ चालणारा पण सर्वांना आवडेल असा कार्यक्रम देण्याविषयी ठरले होते. सर्व बाजूनी विचार करून 'जलतरंग'-वादनाचा कार्यक्रम मी नक्की केला. त्यावेळी त्या वाद्यावर माझा हात तयार होता व त्यासंबंधी माझे नांव सर्वंध पंजाबमधे गाजत होते.

ठराविक दिवशी व वेळेवर दोन शिष्य व एक तव्वलजी यांसह मी तेथे पोहोचलो. एका टेबलावर जलतरंग मांडण्यास सुरुवात केली. तेव्हा लक्षात आले की जलतरंग वाजवावयाच्या काठ्या घरीच विसरून आलो! छातीत धस्स झाले. गव्हर्नरांचे आगमन होण्यास वेळ थोडाच होता. आता काय करावे? घर तर दूर तीन-चार मैलांवर–काठ्या आणणे शक्यच नव्हते.

तितक्यात एक कल्पना सुचली. मी चटकन् बाहेर जाऊन स्टेशनरीच्या दुकानातून दोन शिसपेन्सिली विकत आणल्या. आणि त्या वापरून त्या दिवशीचे काम उत्तम प्रकारे पार पाडले. गव्हर्नरानी जातिनिशी समोर उभे राहून जलतरंग-पात्रे, त्यातील पाणी वगैरे पाहिले. खूष होऊन 'व्हेरी गुड' शब्दांचा अहेर केला, व नंतर जादूचा कार्यक्रम ते बघू लागले. मी मात्र पूज्य गुरुजींचे स्मरण करीत, आजचा दिवस निभावून माझी लाज राखल्याच्या आनंदात बिदागीची रक्कम खिशात टाकून घरी परतलो.

# नारदाची गादी आणि गुरु–शिष्य

मला लहानपणापासून कीर्तन करण्याची हौस होती. याचे श्रेय त्यावेळचे माझे त्या विषयातील गुरु वे. शा. सं. सदाशिव शास्त्री भिडे 'गीता–वाचस्पति' व वे. शा. सं. विठ्ठलशास्त्री जोशी यांजकडे आहे. भिडे गुरुजींनी मजकडून 'कालियामर्दन–आख्यान' व त्याला उपयुक्त पूर्वरंग याचा कसून अभ्यास करून घेतला. गीताभ्यास व पठणही नियमितपणे होत असे. मी नाशिकच्या श्रीरामाधार आश्रमात होतो. त्यावेळी वे. शा. सं. विठ्ठल शास्त्री जोशी यानी पण माझेकडून दोन–तीन आख्याने–मार्कंडेय चरित्र, गोरा कुंभार इ.–बसवून घेतली होती. त्या आश्रमात दर एकादशीला कीर्तन होत असे.

अशाच एका वेळी मला कीर्तन करण्याची आज्ञा झाली. कीर्तन पाठ होते खरे. पण प्रत्यक्ष करण्याची पाळी आल्यावर जीव घाबरू लागला. शेवटी सर्वांनी धीर दिल्यावर खादीचे धोतर, खादीचा शर्ट व टोपी घालून हरदास तयार झाला. अस्मादिकांनी त्या दिवशी मार्कंडेय आख्यान लावले. सर्वांनी कौतुक केले. म्हाताऱ्या–कोताऱ्या बाया तर "जनुभाऊ सुंदर कथा केलीत हो", म्हणून कौतुक करू लागल्या. मोठी मंडळी आरंभानंतर पाया पडू लागली. तेव्हा मात्र चमत्कारिक वाटले. अशा रीतीने पहिले–वहिले कीर्तन सुंदरपणे सुफल झाले. मला अधून मधून कीर्तनाची आज्ञा होऊ लागली. त्यामुळे अभ्यास सहजच वाढू लागला. पुढे आयुष्यात हौस म्हणून या नादाचा मला बराच उपयोग झाला. ते असो.

त्याच सुमारास नाशिकला कीर्तन–संमेलन भरवावयाचे गुरुजींनी ठरविले. प्रमुख पाहुणे म्हणून वेळेचे सुप्रसिद्ध हरिदास, मुंबईचे ढोले बुवा याना पाचारण केले होते. इतरही नामांकित कीर्तनकार आमंत्रित होते. त्या सर्वांचे पंचवटीत आगमन झाले. खूप कीर्तने ऐकावयास मिळणार म्हणून मला मनातून खूप खूप आनंद झाला होता. संमेलन चार दिवस. तेही अहोरात्र चालावयाचे होते. त्यामुळे हरिदासांच्या पाळ्या लागल्या.

दुसऱ्यास त्रास होऊ नये म्हणून गुरुजीनी मध्यरात्री दोन ते पहाटे पाच अशी वेळ आपल्याकरिता राखून ठेवली. व लोकांच्या आवडीने इतरांच्या वेळा निश्चित केल्या. लोकांची तुफान गर्दी चोवीस तास कीर्तन ऐकण्यास बसलेली असे. रात्री गुरुजींच्या वेळेलाही काही श्रोते निश्चितपणे असावयाचेच.

प्रत्येक कीर्तनकाराने आपले कीर्तन संपल्यानंतर दुसऱ्या हरिदासाच्या गळ्यात एकतारी व माळ घालून, त्याला नमस्कार करून जावे, असा पायंडा होता.

त्याप्रमाणे एके सकाळी गुरुजींचे कीर्तन सहाला संपल्यानंतर माझी कीर्तनाची पाळी आली. मी तेथे पोहोचल्याबरोबर गुरुजींनी एकतारी माझ्या गळ्यात अडकविली, व माळ घालू लागले. स्वाभाविकच लाजून संकोचून मी बरेच आढेवेढे घेतले. तेव्हा गुरुजी म्हणाले, "ही नारदाची गादी आहे. येथे लहानमोठा भेद नाही." असे म्हणून माळ माझ्या गळ्यात घालून माझे कीर्तन ऐकण्यासाठी तेथेच बसले. माझी मात्र घामाघूम स्थिती झाली. कीर्तनाचा विषय विसरतो की काय अशी घबराटही निर्माण झाली. मग परमेश्वराचे नांव घेऊन कीर्तनास सुरुवात केली. गुरुजी थोडा वेळ बसले, व पाठीवर शाबासकीचा आशिर्वाद देऊन विश्रांतिसाठी निघून गेले. मग मात्र माझ्या वाणीला जोर चढला. त्या कीर्तनानंतर गुरुजीनी आपली एक जरीची कफनी मला 'प्रसाद' म्हणून दिली.

[क्रमशः]










# 'शिव्यायन'



—वि. रा. भाटकर

**सर्वच लोक तुम्हाला गाढव म्हणू लागले की गर्दभ-गायनास तुम्ही खुशाल प्रारंभ करावा.**



**कबूल,** कबूल ! एकदम कबूल !

तुमचं म्हणणं, सगळ्या बायका तुम्हालाच कशा शिव्या देतात ?

ते आता मी तरी काय सांगू ? देतात एवढं मात्र खरं !

मागे मी मुंबईच्या एका चाळीत तिसऱ्या मजल्यावर राहणाऱ्या माझ्या एका मित्राला भेटायला गेलो असता, दुसऱ्या मजल्यावर राहणाऱ्या, समोर बाजाची पेटी ठेवून आरडा ओरडा करीत बसलेल्या बाईने मला शिव्या दिल्या होत्या हे तुम्हाला माहीतच आहे.

तसेच मी एकदा आंघोळ करून बाहेर गॅलरीत येऊन 'आली रे आली, आली रसाळ आंबेवाली' हे गाणं म्हणत असताना नेमक्या याच वेळी खाली फाटकातून आत शिरत असलेल्या एका रसाळ आंबेवालीने मला शिव्या दिल्या तेहि तुम्हाला माहीत असेलच.

मी माटुंग्याला राहणाऱ्या माझ्या काकूंकडे चाललो असता समोरून चालणाऱ्या बाईचा काष्टा अगदी सुटत आला असल्याचे माझ्या लक्षात आले. 'अहो बाई, तुमचा काष्टा सुटतोय् बघा !' असे मी तिला सांगितले. तिने काष्टा ठीक करता करता, काष्टा सुटत आल्याचे तिच्या निदर्शनास आणून दिल्याबद्दल माझे आभार मानावयाचे सोडून, मला शिव्या दिल्या. 'बायकांच्या काष्टयाकडे तुझं लक्ष कशाला रे मेल्या ?' असेहि ती म्हणाली. आता मी काय बोलणार, कपाळ ? एखादी इंग्रज स्त्री असती तर लगेच, 'ओहह, थँक यू सो मच् !' असे म्हणाली असती. पण इंग्रज स्त्रिया झगा घालतात. त्यामुळे काष्टयाचा प्रश्नच येत नाही. मग तो सुटणार कसा ? व्हॉट् ?

आईने सांगितल्यावरून पार्ल्याच्या मार्केटात भाजी आणायला गेलो असता, अलकोल विकणाऱ्या एका बाईला 'अलकोल कसे दिले ?' असे मी विचारले. 'किती घ्यायचे ?' तिने विचारले. 'दोन हवे आहेत,' मी म्हणालो. खरं सांगतो, मला दोनच अलकोल हवे होते. पण मी हे बोलत असताना माझे लक्ष (नेहमीप्रमाणे चुकून) 'भलतीकडे' गेल्यामुळे व ते नेहमीप्रमाणे तिच्या लक्षात आल्यामुळे तिने अलकोलऐवजी मला शिव्याच दिल्या.

पुण्याला असताना मी 'लकी' रेस्टॉरंटमध्ये चहा पीत बसलो होतो. तेव्हा तीन मुली (मोठया) इतर सारी टेबले सोडून नेमक्या माझ्याच टेबलावर येऊन बसल्या. यातील एक फारच सुंदर होती. मला एकाएकी काय वाटले कुणास ठाऊक, त्या सुंदर मुलीकडे पाहून मी म्हणालो, 'अहाहा ! आमच्या मासाहेब अशा सुंदर असत्या तर आम्ही सुद्धा असेच सुंदर झालो असतो.' खरं सांगतो, मी हे अगदी सहज, अगदी अभावितपणे म्हणालो होतो. पण त्या सुंदर पण मूर्ख मुलीला ते न समजून आपली टिंगळ करण्यासाठीच हा दाढीवाला असे बोलला असे वाटून तिने मला शिव्या दिल्या. नंतर रेस्टॉरंटमध्ये बसलेल्या काही निरुद्योगी लोकांनी तिची बाजू घेऊन मला मार देण्याची धमकी दिली. 'तुमची दाढी जाळून टाकू !' असेहि त्यातील एकजण म्हणाला. पुण्याचे लोक महा वाईट हेच खरं. नाही, म्हणजे, मारा ! बेदम मारा ! कारण नसताना मारा ! पण दाढी जाळायची म्हणजे काय ?

कर्जत येथे एका वारली बाईने खाली जमिनीवर असलेला लाकडांचा भारा उचलून डोक्यावर देण्यासाठी अस्मादिकांची मदत मागितली. 'दादा, जरा हात लावता का ?' तिने विचारले. बाई मस्त होती. तिची 'सहज गंमत' करण्यासाठी मी म्हणालो, 'कशाला हात लावू ?' 'गंमत' अंगाशी आली. ती मला शिव्या देऊ लागली. तेवढयात आणखी दोन बायका (त्यांच्या मडक्यांवर एक एक भारा होता) आल्या आणि मग त्या तिघी मिळून मला शिव्या देऊ लागल्या. 'जटलमन दिसतोय, पण बायकाना छेडतो. मारला पाहिजे साल्याला,' असेहि मग एक निरुद्योगी येणारा म्हणाला. आणखी काही 'रेडयानी मग त्याला साथ





अनुक्रमणिका

दिली. म्हणजे मला मारण्याची धमकी दिली. असो. पुण्यापासून कर्जत काही फार दूर नाही. खरंना ?

वसईला मावशीकडे असताना मावशीने मला गाईचे दूध आणावयास सांगितले. गावात एका बाईकडे गाय होती. तिच्याकडे जाऊन मी तिला (चुकून) 'बाईचं दूध मिळेल का ?' असं विचारले. तिने मला दूध देण्याऐवजी शिव्या दिल्या. (दूध देऊन वर शिव्या दिल्या असत्या तर गोष्ट वेगळी होती. पण नुसत्या शिव्या द्यायच्या म्हणजे काय ?)

वसईलाच असताना नायगाव स्टेशनवर पुढचात 'पापलेट' नांवाच्या मत्स्यप्रकाराने भरलेली टोपली घेऊन बसलेल्या एका कोळणीला मी 'पापलेट केवढचाला दिलं ?' असे विचारताच ती एकाएकी मला शिव्या देत उठली आणि दूर जाऊन पुन्हा फतकल मारून बसली. ती वेडी असावी असा मी तर्क केला. पण त्या शिव्यांचे खरे कारण मला नंतर एका मित्राकडून समजले, तेव्हा सारा उलगडा झाला. पापलेटाला तेथील लोक 'सरंगा' असे म्हणतात. आता मस्नी ह्यो काय टाव हुतं होय ? उगाच शिव्या द्याच्या मंजी काय ? व्हॉट् ?

आईने घरी एका वोहारणीला बोलावले होते. आईने कपडे दाखवल्यावर 'यवढचावर काय देनार वाय ? गोल वरनी दील एक,' असे ती म्हणाली. तिने 'गोलावरनी' असे म्हणताच माझे लक्ष अभावितपणे गोला वरणी एवढचाच मोठचा अशा तिच्या स्तनाकडे गेले. नेहमीप्रमाणे माझ्या दुर्दैवाने तिच्या ते लक्षात आले आणि ती लगेच टोपली उचलून शिव्या देत देत 'गोला वरनी' न देताच निघून गेली.

असेच एकदा आमच्या घरी माझ्या मोठचा वहिणीची एक मैत्रीण आली होती. वहिणीने तिला वसण्यासाठी खुर्ची दिली. आईने तिला ऐसपैस वसता यावे म्हणून चटई अंथरली. 'अय्या, चटईवर बसू की खुर्चीवर?' 'कुठेहि बसा, मी म्हणालो, 'माझ्या मांडीवर बसलात तरी माझी काही हरकत नाही !' ती चटईवरहि बसली नाही की खुर्चीवरहि वसली नाही. (माझ्या मांडीवर तर नाहीच नाही.) मला (सभ्य शब्दात) शिव्या देत देत फणफणत ती आली तशी निघून गेली.

अहो.

अलम् अनेन शिव्या पुराणेन.

"When everybody says you are an ass, it is high time to brey." अशी इंग्रजी भाषेत एक म्हण आहे.

म्हणजे सर्वच लोक तुम्हाला गाढव म्हणू लागले म्हणजे आता हाँऽहाँऽहाँऽ करायला हरकत नाही असे खुशाल समजा.

त्याप्रमाणेच सर्व बायका मलाच शिव्या देतात त्या अर्थी वायकांच्या बाबतीत माझेच काही तरी चुकत असले पाहिजे, असे म्हणायला हरकत नाही.

काय चुकते ते शोधून काढण्याचा प्रयत्न चालू आहे.

सुधारणा करण्याचा प्रयत्न चालू आहे.

काही सुधारणा झाल्यास तुम्हाला कळवीनच.

अच्छा ! टाऽ टाऽ वाय्य !! ●●●



## कुत्रा हरवला

अव्वल इंग्रजीत मुंबईत काही इंग्रजी वर्तमानपत्रं निघत. त्यांचा चरितार्थ जेमतेमच चाले. एकदा मुंबईच्या एका कलेक्टरचा एक सुरेख 'गोल्डन रिट्रीव्हर' हरवला. पोलिसाना खबर द्यावी, आणि वर्तमानपत्रात जाहिरातही, म्हणून कलेक्टर महाशय टाईम्सच्या कचेरीत गेले आणि तिथून कुलाब्याच्या एका नेटिव्ह माणसाने चालविलेल्या वर्तमानपत्राच्या संपादकाकडे गेले. त्यानी जाहिरात लिहिली:

"कुत्रा हरवलाय. गोल्डन रिट्रिव्हर. शोधून आणून देणाऱ्यास ५० रु. इनाम."

आणि ती संपादकाच्या स्वाधीन केली. संपादक म्हणाला, काही काळजी करू नका मी नीट छापतो.

कालेक्टर घरी जायला निघाले. वाटेत त्याना आठवण झाली की, आपण जाहिरात देताना चूक केली आहे. नर का मादी याचा जाहिरातीत खुलासा नाही.

ते परत फिरले आणि वर्तमानपत्राच्या कचेरीत आले. पाहातात तो संपादक जागेवर नाही. ते कारकूनाला म्हणाले, मोठा घोटाळा झाला, मघाशी जाहिरात देताना मजकुरात थोडी चूक झाली आहे. —संपादक गेले कुठे ?

कारकून शांतपणे म्हणाला, "संपादक आपल्या पाठोपाठच कुत्रा शोधायला बाहेर पडलेत."

## मीही येथे आहेना!

पूर्वी मामलेदाराच्या हाती फार मोठी सत्ता होती. त्याना मॅजिस्ट्रेटचे सर्व अधिकार होते. त्यामुळे मामलेदाराचे कोर्ट म्हणजे एक गंमत असे. एकदा मामलेदारासमोर खटला चालू होता. दोन वकील जोरजोरात भांडू लागले. त्यावेळी मामलेदार पेंगत होते खुर्चीवर. भांडता भांडता एक वकील दुसऱ्या वकीलाला म्हणाला की, तुम्ही शुद्ध गाढव आहात.

त्याची ही इरसाल शिवी ऐकून तो दुसरा वकील जोरात म्हणाला की तुम्हीहि शुद्ध गाढव आहात.

इतक्यात पेंगणारे मामलेदार जागे झाले आणि म्हणाले ऑर्डर, आर्डर. या कोर्टात तुम्हा दोघांशिवाय मी इथं वसलेला तुमच्या खिजगणतीतहि नाही ! पुन्हा तेच आर्ग्युमेंट करा ! !

—'त्रिदंडी'






## समर्पणाचा अंगीभूत गोडवा




**महानगर ● ब्रँडमन**

'**महानगर**' ही विनोदी लेखक म्हणून प्रसिद्ध असलेल्या श्री. रमेश मंत्री यांची कादंबरी. वास्तविक मंत्रीनी केवळ विनोदी लेखनाचे एकमेव विक्रेते ठरावे असे लेखन केलेले नाही. त्यानी काही गाभुळलेल्या आणि गंभीर कथा पण लिहिल्या ( पाहा 'अखेरची शिकार' आणि अन्य कथा ) आहेत. वृत्तपत्रीय लेखनात त्यांच्या चौफेर, चौकस, रसिक आणि विनायास विश्लेषण करण्याच्या शैलीचा दाखलाहि भरपूर प्रमाणात उपलब्ध आहे. त्यांच्या विपुल, विविध आणि सातत्यपूर्ण लिखाणाचा नीट कानोसा घेणाऱ्याना त्यांच्या लेखनाची क्षमता, विषय आणि आशयानुकूल परिमाणे धारण करू शकते याची कल्पना आणि अपेक्षा आहे. '**महानगर**' या कादंबरीने ही कल्पना यथार्थ आणि ही अपेक्षा सार्थ ठरवली आहे.

पण जे त्यांच्या साहित्याकडे त्यांचा 'टाईप' करून पाहतात त्यांना 'महानगर' ही कादंबरी न कळण्याची शक्यता अधिक आहे. आणि आतापर्यंत जी परीक्षणे या कृतीच्या अनुषंगाने प्रसिद्ध झाली आहेत त्यावरून हेच प्रकट झाले आहे. त्यातहि गंमत अशी की, ज्यानी 'महानगर' ही टाकाऊ ठरवली आणि ज्यानी टिकाऊ ठरवली त्या दोघानाहि '**महानगर**' कादंबरीचा पूर्ण आवाका ध्यानात आला नाही. (पाहा 'आलोचना' मासिकातील जाने. ६७ अंकातील प्रतिकूल आणि 'दीपलक्ष्मी' मार्च अंकातील अनुकूल परीक्षण )

'**महानगर**' ही एक केवळ दिलचस्प प्रेमकथा नाही हे सुरवातीलाच स्पष्ट केले पाहिजे. ती एक विदारक जीवन-गाथा आहे. कुणी म्हणतील प्रेमकथा ही जीवन-गाथा नसते किंवा होऊ शकत नाही काय? तसे पाहिले तर प्रत्येक ललित कृति ही जीवन-गाथाच नसते काय? हे प्रश्न एक परीने योग्यच म्हटले पाहिजेत. पण विवेचनाच्या सोयीकरता काही स्थूल भेद केव्हा केव्हा करणे जरूर असते. प्रस्तुत कादंबरीच्या अनुषंगाने ती एक जीवन-गाथा आहे असे विधान करावयाचे ते अशा करता कीं, त्यात आलेल्या प्रेम-प्रकरणावर भर देऊन कादंबरीचा विचार केल्यास कादंबरीचा आशय निसटायचा. अर्थात् ती जीवन-गाथा आहे असे म्हटल्यास आशय बोध पूर्णपणे होत नसला तरी तो आशय समजून घेतला पाहिजे हे सूचित करावयाचे आहे. कारण जीवनाला जसे अनेक पदर आहेत तद्वत जीवनानुभव हा विचित्र आणि गुंतागुंतीचा असतो. महाकवि बेन्द्रे यानी म्हटल्याप्रमाणे 'काळजी न घेतलेल्या केसाच्या जटा बनतात. त्या जटांची वेणी घालावयाची झाल्यास केस न् केस उकलून विंचरावा लागतो. जीवन हे जटेसारखे गुंतागुंतीचे होऊन बसलेले असते.' मंत्री यानी '**महानगर**'मध्ये असाच एक जीवनाचा गुंता उकलावयास घेतला आहे. केस न् केस विंचरावयास सुरुवात केली. केस तुटू नये आणि गुंता सुटावा अशा हळुवारपणे त्यानी हाताळणी केली. मोहक वेणी बांधून तयार केली खरी पण त्यात वेणी पूर्ण होईपर्यंत पांढरे केस डोकावू लागले अन् सबंध कलाकृतीला एक दाट करुणेची छटा प्राप्त झाली.

—हा गुंता आजच्या प्रचंड, अजस्र, समर्थ, विज्ञानपूत, तांत्रिक व यांत्रिकरित्या बद्ध अशा शहरी आणि नागरी आयुष्यक्रमाच्या संदर्भात पाहिला पाहिजे. आपले आजचे शहरी जीवन विस्तारलेले, क्षणाक्षणाला विस्तारणारे, उपजिविकेचे अवसर असलेले, जागेची व पाण्याची टंचाई असलेले, नाना माणसाना पोटात घेतलेले आणि अतिशय गतिमान झालेले असे आहे. प्रत्येकजण व्यवसाय, उद्योगधंदा आणि उपजिविकेच्या समस्येत व्यस्त आणि ग्रस्त, वेळ आणि उसंत नसलेला आणि मनोमनी शांततेचा, सुखाचा आणि मुक्तीचा अखंड ध्यास घेतलेला, कुठेही गर्दी करणारा, गर्दीत हरवणारा आणि व्यक्तिमत्व घालवणारा. या जीवनात कमालीचा असंतुष्ट असलेला तरीही या जीवनाची चटक लागलेला व हे जीवन सोडावयास तयार नसलेला.'

आपल्या देशातल्या काही औद्योगिक शहरात ( मुंबई, कलकत्ता, दिल्ली, इ. इ. ) याचे दर्शन व प्रदर्शन आढळते. पाश्चात्य देशात औद्योगिकरण कमाल झालेल्या शहरातल्या जीवनात याचे उग्रत्व अधिक प्रकर्षाने दिसते आणि जाणवते, परन्तु जगभर साऱ्या औद्योगिक शहरांची ( लंडन, न्यूयॉर्क, शांघाय, मुंबई, कलकत्ता इ. इ. ) ही वाटचाल आहे. घड्याळावरहुकूम चालणाऱ्या व क्रमणाऱ्या आयुष्याला केवळ वर्तन-वादाचे स्वरूप येणे क्रमप्राप्त झाले आहे. मनासारखे होणे आणि असणे यांचा मेळ नाही. मेळ नाही म्हणून संवाद नाही. संवाद नाही म्हणून व्यक्तिमत्व दुभंग आणि द्विधा आहे. स्वतःबरोबर अखंड झगडा ठेवणारे आणि करणारे आहे. काही मूल्ये ( नैतिक, धार्मिक, सामाजिक ) कालबाह्य ठरलेली तर काही सोडलेली ( गैरसोयीची म्हणून ).






नवीन मूल्ये स्वानुभूतीतून उद्‌भूत व्हावी असा जीवनाचा आकृतिबंध नाही अशी तक्रार असलेला. त्यात आपल्या देशातल्या माणसाची, (परंपरा, प्रदेश, वंश आणि कुळ यांच्या संस्कारातून आणि मर्यादातून वाढताना) विज्ञानमय आधुनिक आणि गोजिरेसाजिरे भासणारे अध्यात्मिक पारलौकिक यांच्यातून काही ठाम आत्मसात् करण्यात निवड पांगुळली आहे. भौतिक आणि पारमार्थिक, भोगवादी आणि योगवादी जीवन या दोहोतले सोयीस्कर तेवढे आणि अहंकाराला पूरक असे अंगिकारणारे आणि त्यामुळे दोन्ही बाबतीत अपुरेपणा व अतृप्ति याचाच परिणाम भोगणारे व्यक्तिमत्व हिंदकळत राहते.

'**महानगर**' या कादंबरीत अशाच एका माणसाची आणि त्याच्या जीवनात आलेल्या स्थलाची आणि स्त्रीची 'चित्रणे' आहेत. श्रीकांत हा भारतीय तरुण परदेशात (लंडन) उच्च शिक्षणाकरिता गेलेला आर्थिक दृष्ट्या पूर्णपणे स्वयंपूर्ण नसलेला. आणि परदेशातल्या मोकळ्या स्त्री–पुरुष संबंधाच्या बाबतीत कल्पना करू शकणारा पण अनुभव न घेतलेला, परन्तु त्याकरता (पार्थिव अपार्थिव गोंधळाच्या वळणाने) आसुसलेला. श्रीकांतच्या तेथील वास्तव्यात परदेशातल्या मुक्त जीवनात वाढलेली ॲना नावाची सुजाण, बुद्धिवादी आणि अंतःकरणशील तरुणी येते. तीही स्वयंपूर्ण नसते. शिकाऊ असते. शहरी जीवनाच्या एकंदर रितीला, गतीला आणि व्यवसायाला अनुसरून श्रीकांत-ॲना यांचे संबंध येतात. कडेकडेने ते संबंध वाढतात. दृढ होत जातात. पुढे पुढे त्याला स्निग्धता येते. अंतर नाहीसे होते. आडपडदा राहत नाही. स्त्री–पुरुष संपर्कातला खाजगी स्वरुपाचा जो शारीरिक संबंधाचा भाग प्रेमाला मूर्तता आणि कृतार्थता आणतो तोहि श्रीकांत-ॲना यांच्या काही दिवसांच्या सहजीवनात सहज विलसला. आत्मविस्मृति आणि अर्पणाच्या अवगुंठनातला अंगीभूत गोडवा त्यांच्या नात्यात निर्माण झाला. या गोडव्यानेच ममता आणि ममत्व आणली. ताटातूट नको अशी ओढ आणि त्याबरोबर या नात्याला सातत्य यावे अशी इच्छा मनोमनी अंकुरित झाली. तारुण्यात वास्तव आणि स्वप्न यांचा खेळ खेळताना ज्या येरझारा वास्तवातून स्वप्नात आणि स्वप्नातून वास्तवात चालू असतात त्याना प्रेमाची मात्रा जेव्हा लाभते तेव्हा त्या येरझारा धुंद-फुंद होतात. वास्तव आणि स्वप्न यांच्या सीमारेषा पुसटतात. सर्व जग तुच्छ वाटते. नल-दमयंती, लैला-मजनू, हिर-रांझा, आठवा एडवर्ड अशी उदाहरणे होती व ती नजरेपुढे यावयास वेळ लागत नाही. ही ऐतिहासिक झालेली उदाहरणे असली तरी अशा अनिवार प्यारची झालर लागलेली मंडळी कमी नव्हती. परन्तु आजच्या युगात ही नाती कोणत्या तरी मोठ्या चक्रव्यूहातल्या नात्यासमोर निष्प्रभ ठरतात. गौण बनतात. समासात पडतात. प्रेमाची मस्ती ही पण तकलादू ठरते. उत्पन्न झालेला जिव्हाळा तोडावा लागतो. तसे तोडणे क्रमप्राप्त आहे असे समवस्थापन येते. आयुष्यक्रम पूर्वीप्रमाणे सुरू होतो. जीवनहि पुन्हा पूर्वपदावर आल्यासारखे वाटते. वास्तविक जीवनप्रवाह अप्रतिहतपणे चालूच असतो. अर्थात् वावटळीत किंवा समस्येत सापडलेल्या आणि त्यातून पलायन करणाऱ्याना जीवन कुणाकरता थांबत नाही या समाधानाने आणि समजूतीत कालक्रमणा करण्याखेरीज गत्यंतर नसते. श्रीकांतलाहि असेच आपले पाय भूतलावर असल्याचें अवधान गमावणे शक्य नव्हते. भावनोत्कटता आणि प्रेमार्द्रता यांचा परमोत्कर्ष झाला असतानाहि आयुष्यातील प्रीतीचा सुवर्णक्षण केवळ स्मृतिरूपाने स्थिर करणेच व्यवहार्य आहे असे त्याला मानावेच लागते. वस्तुनिष्ठतेची जाणीव आणि आच याची दखल घ्यावी आणि करून द्यावी लागली. ज्या नगरात ती दोघे (श्रीकांत आणि ॲना) एखाद्या दैवी योजनेसारखी एकत्र आली आणि भेदातीत झाली त्या नगरीतच ती एकमेकापासून सामोपचाराने आणि सामंजसाने दूर झाली. अदृश्य जणु झाली. त्या नगरीने त्यांचे प्रेम आणि त्या प्रेमाचा निरोप पोटात घेतला. असं त्या नगरीने काय काय पोटात घेतले असेल? किती घेतले असेल? असं घेऊनच ती नगरी 'महानगर' झाली!

'महानगर' कादंबरीबद्दल पारंपारिक भाषेत बोलायचे झाल्यास असं म्हणता येईल की, या कादंबरीचा नायक ठरवायचा झाल्यास तो हे 'महानगर' होय. आजच्या संस्कृतीच्या आणि जीवनाच्या संदर्भात, प्रेमासारख्या मूलभूत भावनेचा उद्रेक आणि परिपोषहि या मोठ्या शहरात येतो–जातो इतके ते सर्वव्यापी आणि सर्वभक्षक झाले आहे. पाहता पाहता प्रेमाला आणि प्रेमिभूत व्यक्तींना उठाव मिळतो ना मिळतो तोच त्या नगरीच्या प्रचंड प्रक्रियेत ते सारे गडप होते. याला कुणी शोकांतिका म्हणो किंवा काही म्हणो पण वस्तुस्थिती मात्र अशी विदारक आहे. आणि हाच 'महानगर' कादंबरीचा विषय आहे आणि त्यांची मांडणी करण्यात श्री. रमेश मंत्री याना बऱ्याच प्रमाणात कलात्मक यश आलेले आहे.

–बऱ्याच प्रमाणात म्हणायचे कारण असे कीं, रमेश मंत्रीनी ह्या आशयात अफरातफर होऊ दिली नाही. अनाहूत जाणीवेची भाषा आणि निवेदन टाळून साध्या सरळ भाषेत त्यानी आपल्या ललित कृतीची आकारणी केली. काही प्रमाणात संथ वाटेल अशी सुरवात करून यंत्रमय जीवनात मनुष्याच्या जगण्याचा संथ प्रवाह पाहता पाहता कसा बेमालूमपणे गतिशील बनतो आणि ती गति कशी आटोक्यात राहत नाही याचे अकृत्रिम आणि बव्हंशी भाष्य टाळून निवेदन आणि वर्णन केले आहे. परन्तु मंत्री यांच्या 'महानगर' या कृतीला मर्यादा ज्या पडल्या आहेत त्या त्यानी काही गोष्टी गृहित धरल्यामुळे पडल्या आहेत. त्यापैकी पहिली ही की, आपण




पाश्चात्य जीवनावर आधारलेली कादंवरी लिहीत आहो आणि त्या जीवनाबद्दल व्यावहारिक माहिती दिलीच पाहिजे या (गैर) समजूतीपायी आलेली कादंवरीतली वरीचशी अनाठायी माहितीवजा वर्णने. पान १, १२, १८, ५१, ६०, इ. इ. वरची ही वर्णने रसापकर्षक नसली तरी 'कादंबरीचा' विषय आणि आशय परिपोष करण्याकरता फारशी पूरक ठरत नाहीत. दुसरे असे की, कादंवरीचे विश्व सहज घडलेल्या प्रसंगातून आणि त्या प्रसंगाशी संवादी किंवा समांतर असलेल्या मनोव्यापारातून उत्क्रांत होतं आणि उमलत जावे म्हणून जी प्रकट–अप्रकट चिंतनाची निवेदन शैली मंत्रींनी अवलंबली आहे ती काही ठिकाणी सैल झाल्याने कादंबरी लांबली आहे. जागरूकतेने कादंबरीच्या या अंगाकडे पाहिल्यास निदान पन्नास पाने तरी कमी व्हावीत. कदाचित् यामुळेच असेल की कादंबरीचा आशय लेखकानी अप्रत्यक्ष सूचवला असूनहि (पान १०१, –'नाहीतर या अजस्र महानगरात कोण कुणाची एवढी भीड मुर्वत ठेवतं!' पान १३७–'बोलून चालून आपण एका वेटिंगरुममधले प्रवासी, थोडावेळ भेटणार, पुन्हा आपल्या मार्गानं जाणार–', पान १४९-'हा सरळपणा, ही विशाल सहानुभूति हे इंग्लंडच सहज सौंदर्य आहे. पण महानगरांच्या पोलादी संस्कृतीत हे टिकू शकत नाही, हे मोठं दुर्दैव आहे.') (काही) वाचकांना तो पूर्णपणे चिमटीत पकडता येत नसावा. आणखीन् एक भाग जो खटकणारा वाटला तो शेवटी शेवटी आलेल्या शृंगारिक वर्णनाचा. पान २१४-२१५ वरचे वर्णन कसे आहे ते नजरेखालून घातल्यावर कल्पना येईल 'त्यानं तिच्या ब्रेसियरचा हुक धडधडत्या छातीनं आणि थरथरत्या हातानंच काढला. तिचे उरोज पाहण्याची त्याला तीव्र इच्छा झाली. आणि त्याने तिच्या खांद्याला धरून तिला चटकन् आपल्या बाजूला फिरवून घेतलं. दोन स्वतंत्र, सजीव सशाप्रमाणे ते मऊ मऊ स्तन ववस्तन करीत खाली वर होत होते. त्याने त्यावर एकदा हळुवार हात फिरवला आणि मग अॅनाला अगदी जवळ ओढून घट्ट आलिंगन दिले. त्याला तिचं चुंबन घ्यायचं होतं. पण तिला त्यानं इतक्या वेगानं जवळ ओढलं होतं, कीं त्याचे ओठ तिच्या ओठाना भिडण्याऐवजी त्याने तिच्या कानाखालील मानेचा लुसलुशीत भागच आपल्या ओठात धरला आणि अधाशी बालक दूध चोखते तसा तो चोखू लागला. तिनेही त्याला अगदी घट्ट पकडून ठेवले होते.

तिच्या उभार उरोजांचा सुखद् दाब त्याच्या पुरुषी छातीवर पडत होता. त्या दावाने तिचे स्तन चपटे झाले होते. आणि त्यामुळे पसरलेल्या त्या उरोज युगुलाने त्याच्या छातीचा अधिकच विस्तार व्यापला होता. या वर्णनाचा एकंदर रोख कादंबरीच्या एकंदर सूराशी मिळता नाही. त्याने त्या दोघांच्या संबंधावर वेगळा आणि आवश्यक प्रकाशझोत पडला असेहि नाही. असं असताना हे वर्णन कां आले? कदाचित अप्रत्यक्षपणे कादंबरीची रंजकता आणि आकर्षकता सवंग करण्याचा मोह मंत्रींना बेसावध तर करून गेला नाही ना?

हे दोष सोडले तर कादंबरी मराठीचे लेणे ठरावे इतकी अप्रतिम आहे. प्रेमासारखी मूलभूत भावना सारे बंध आणि मर्यादांचा अडसर ओलांडून वर येते आणि महानगराच्या किचकट–विचकट अरण्यात गडप होते. ही आजच्या संस्कृतीची शोकांतिका मानावी काय? मंत्री भाकीत करण्याच्या भानगडीत पडले नाहीत. परन्तु या विषयाला आवश्यक ती खोली आणि आर्द्रता आणण्याकरता त्यानी अॅना ही नायिका ज्या कौशल्याने आणि कल्पकतेनं निर्माण केली आहे तिला तोड नाही. 'आधीच माणसाचं आयुष्य थोडंसं. त्यातल्या त्यात स्त्रीचं आयुष्य तर फारच मर्यादित. लहानपणी ती आईबापांच्या धाकात असते. इकडं जाऊ नकोस, अमुक करू नकोस, तमक्याशी बोलू नकोस, बाहेर पडू नकोस–अशा शेकडो बंधनात ती घुसमटते. कशी बशी ती तरुण होते तोवर लग्न होते. मग नवऱ्याच्या बंधनात. पुढे मुलं झाली, की, मुलांसाठी तिनं जगायचं, माझ्या मनात कधी कधी प्रश्न उत्पन्न होतो. स्त्रीनं स्वतःसाठी जगायचं तरी केव्हा? मी तुझ्याबरोबर अशी एकटी आले नि मागे इतर कुणाबरोबर तरी स्वैर वागले, त्या वागण्यात हाहि एक विचार होताच. विचार होता तरी ही बाई एकनिष्ठ बनली. सर्वस्व अर्पण केले. आणि दूर व्हावे लागले! या कादंबरीचे माधुर्य कारुण्य आणि सौंदर्य असे अपूर्व जे आहे ते अॅना या वैशिष्ट्यपूर्ण व्यक्तिमत्वाने विषयाला मनावर कायम ठसा उमटावा असा उठाव दिल्यामुळे. अॅना मराठी साहित्यसृष्टीत अविस्मरणीय ठरेल.

कादंबरीची भाषा आशयाचा अनुगम करणारी आहे. काही स्थली भाषेचा मुलायमपणा आणि 'दर्दभरी'पणा अजोड सिद्ध झाला आहे. वाचताना वाचकाला आपल्या विश्वात खेचून नेणारी ही भाषा आहे. मात्र भाषा जशी, विषय जसा आहे तसे कादंबरीचे मुखपृष्ट नाही. उलट ते पाहिल्यावर कादंबरी एखाद्या पाश्चात्य रांडेची तर कथा नाही ना असे वाटण्याचेच भय अधिक आहे. अर्थात् ही गौण गोष्ट आहे कारण कादंबरी वाचून झाल्यावर मनात कादंबरीचा गहिरेपणाच रेंगाळत राहतो.

**–दा. गो. देशपांडे**

[**महानगर : रमेश मंत्री.** मॅजेस्टिक प्रकाशन, मुंबई–४, मूल्य १० रु.]












## बॉडीलाईनचा कर्दनकाळ--ब्रॅडमन

**जगविख्यात** क्रिकेटपटु डॉन ब्रॅडमन ह्याच्या अनन्यसाधारण क्रिकेट पराक्रमांचे वर्णन करावयाला खरे पाहता खंडप्राय पुस्तके लिहावी लागतील. त्याचे क्रिकेट जीवन इतक्या संस्मरणीय घटनांनी भरलेले आहे, की त्याच्या आयुष्यातील हरएक घडामोडींचा परामर्श एका छोटेखानी पुस्तकात घेणे जवळ जवळ अशक्यच आहे म्हणा ना. परंतु श्री. अरविंद ताटके यानी खूप परिश्रमानंतर ब्रॅडमन चरित्र १७४ पृष्ठात लिहून पुरे केले व त्यात संपूर्ण ब्रॅडमन चितारला आहे. ब्रॅडमनच्या आयुष्यातील सर्व बारीक सारीक घटना एकत्रित करून चटकदारपणे सादर केल्या आहेत. त्याच्या क्रिकेट जीवनातील एकूण एक घटनेचा कोणताहि अपवाद न सोडता थोडक्यात पण रसाळ परामर्ष घेतला आहे.

ब्रॅडमनसारख्या असामान्य फलंदाजाचा परिचय करून देण्यासाठी लेखकाने विशेष पद्धत अवलंबिली आहे. औत्सुक्य वाढविणाऱ्या वेगवेगळ्या शीर्षकाखाली सतरा प्रकरणात त्यानी ब्रॅडमन उभा केला आहे. सुरुवातीला कोणत्या पार्श्वभूमीवर ब्रॅडमन आखाड्यात उतरला, तो मैदानात उतरण्यापूर्वी कोणकोणते नामवंत खेळाडू होऊन गेले, वगैरे वर्णिलेले आहे. शेवटून दुसऱ्या प्रकरणात हॅमंड, हेडले, पॉन्सफोर्ड ह्यासारख्या ब्रॅडमनच्या तोडीच्या कर्तृत्ववान समकालीन क्रिकेटर्सची वर्णने केली आहेत. त्या दोन्ही प्रकरणांवरून त्या सर्वांमध्ये ब्रॅडमनचे स्थान "झाले बहु, होतील बहु, आहेतहि बहु, परंतु या सम हा" असे आहे हे लेखकाने सिद्ध करण्याचा यशस्वी प्रयत्न केला आहे.

**बॉडीलाईन व ब्रॅडमन**

इंग्लंडचा भूतपूर्व कप्तान डग्लस जार्डीन याने शोधून काढलेल्या बॉडीलाईन' ह्या शरीरवेधी गोलंदाजीचा क्रिकेटक्षेत्रात वापर करावा लागला तो केवळ ब्रॅडमन करीताच. ऑस्ट्रेलियाचा पराभव करावयाचा असेल तर ब्रॅडमनच्या फलंदाजीला पायबंद घातला पाहिजे अशी विचारसरणी १९३२-३३ मध्ये ऑस्ट्रेलियाच्या दौऱ्यावर निघालेल्या इंग्लंडच्या संघाची होती. सूक्तासूक्त मार्गाने त्याचा काटा काढून कसोटी सामने जिंकायचे असे कारस्थान इंग्लंडमधील काही क्रिकेटपटूंनी रचले.

'ब्रॅडमनचा उदय झाला नसता तर बॉडीलाईन अवतीर्ण झाली नसती. ही बोलींग म्हणजे ब्रॅडमन विरुद्ध केलेला कट होय,' हे प्रख्यात क्रिकेट समीक्षक जॅक फिंगल्टन ह्याचे म्हणणे ब्रॅडमनच्या असीम कर्तृत्वाची साक्ष पटवून देते.

कमीत कमी वेळात जास्तीत जास्त धावा काढणे हे त्याचे ब्रीद असे. त्याची हिंमत, आत्मविश्वास व चिकाटी जबर आहे. एकाग्रता, जिज्ञासूवृत्तीने अभ्यास करण्याची तत्परता वाखाणण्यासारखी आहे.

त्याची खेळण्याची शैली अगदी शास्त्रीय असे. बॅटिंगमध्ये कला व सौंदर्य ह्यांचा अभाव प्रामुख्याने जाणवत असे. 'पवित्रा, बॅट धरण्याची पद्धत व चेंडू टोलविताना होणारी बॅट वगैरे पाहून प्रेक्षकांना फार वैषम्य वाटे. इंग्लंडमध्ये त्याचा खेळ साफ पडेल अशी अनेक इंग्लिश खेळाडूंची कल्पना होती. एकदा तर मॉरीस टेट ह्या सुप्रसिद्ध इंग्लिश गोलंदाजाला सांगावे लागले, की "बाळ, सरळ बॅटीने खेळ. हल्ली खेळतोस तसा खेळलास तर इंग्लंडमध्ये धावा काढणे तुला अशक्य होईल." परंतु ब्रॅडमनने स्वतःच्याच पद्धतीच्या तेजस्वी खेळाने धावांचे डोंगर रचले आणि सर्वांचा भ्रमनिरास केला, एवढेच नव्हे तर सर्व इंग्लिश रसिक वृंदांची मने काबीज केली. १९२८ ते १९४४ ह्या वीस वर्षांतील त्यांच्या धावांच्या आंकडेवारीकडे नजर टाकल्यास ब्रॅडमनची सर्वश्रेष्ठता कळून चुकेल.

बॅटिंग करीत असताना तो उभा कसा राहात असे, चौकार कसे फटकवीत असे, गोलंदाजाना निष्प्रभ कसा करीत असे वगैरे लेखकाने आपल्या ओजस्वी लेखन शैलीने उत्तम रीतीने रंगविले आहे. तसेच व्यक्ति म्हणून त्याची स्वभावरेखा अगदी वारकाव्याने रेखाटली आहे. क्रिकेटपटु ब्रॅडमनना त्रिखंड कीर्ति लाभली, सावे नागरिक किंवा गृहस्थ म्हणून ते नेहमी 'अप्रकाशित राहिले' हे लेखक संयमाने व निर्भीडपणे म्हणाले.

ब्रॅडमनविषयक उपलब्ध असलेल्या क्रिकेटवरील जवळजवळ सर्व ग्रंथांचा लेखकाने परामर्श घेतला आहे हे पुस्तकाच्या अखेरीस दिलेल्या प्रमुख संदर्भ-साहित्य ह्या परिशिष्टावरून दिसून येते. परिश्रमपूर्वक लिहिलेल्या पुस्तकात आकडेवारी, अचूकपणे देण्याकडे लेखकाचा कटाक्ष दिसून येतो. विनोदी, टीकात्मक, चटकदार आठवणी व छायाचित्रे भरपूर प्रमाणात देण्याचा प्रयत्नहि उल्लेखनीय वाटतो.

ब्रॅडमनच्या फलंदाजीची शैली जरी अनाकर्षक असली तरी प्रकाशकांनी मनोवेधक छपाई व मांडणी ह्या पुस्तकाची केली आहे.

अशा तऱ्हेचा ब्रॅडमनवर सर्वांगीण परिचयात्मक सर्वोत्कृष्ट ग्रंथ लिहून श्री. ताटके यानी ब्रॅडमनवरील चरित्र ग्रंथाची गेली अनेक वर्षे भासणारी उणीव भरून काढली आहे.

**—सुधीर वैद्य**

[**विश्वविख्यात क्रिकेटपटु सर डोनाल्ड ब्रॅडमन** लेखक: **अरविंद ताटके**. निळकंठ प्रकाशन पुणें–९ पृष्ठें १७४ किंमत रु. ५.]

---

## साभार पोच

**मौज प्रकाशन, मुं. ४**

**इंधन**

ले. हमीद दलवाई
मूल्य ४–५० रु.

**झाकोळ**

ले. मनोहर शहाणे
मूल्य ७–०० रु.

**साधना प्रकाशन, पुणे**

**लागेबांधे**

ले. मधु मंगेश कर्णिक
मूल्य ६–०० रु.








## अंजायना पॅक्टोरिस ( काळजी घ्या )

हंसा मंडळी. हंसत रहा! तो समोर जिना दिसतोय् ना! तो प्राध्यापक भगवंत भुस्कुटे यांच्या फ्लॅटमधला जिना! या भगवंत भुस्कुटे! का हो काय झालं? पोट काय दाबताय? मघु-नच छातीवर हात काय ठेवताय? काय झालंय्? अनजाना पॅक्टोरिस? हा काय प्रकार? पुस्तकातून सांगताय्? कसला 'निघंटू' म्हणताय्? असू द्या. असू द्या! तुमची छाती दुखतेय् तर! हार्ट ट्रबल! विश्वास नाही बसत. प्रकृति तर ठणठणित दिसतेय्! दिसते त्यावर जाऊ नका! असा हा शरिराने ठणठणित पण मनाने पोखरलेला प्राध्यापक भगवंत भुस्कुटे! आता हृद-याचा विकार, अकाली मृत्यु, प्रेमळ पत्नीला एकटीला मागे टाकून जाणे आलेच. मग तिची व्यवस्था–त्यासाठी मग येतो तिचा बालपणचा मित्र! मृत्यूच्या समोर भेद उरत नाहीत. उलट नवराच पत्नीला स्वातंत्र्य देतो. हेतू एकच आपण गेल्यावर बाय-कोला हा 'चेंज ओव्हर' बरा वाटावा. मग येतात वकील मित्र ( माफक पेयपान, शुद्ध कायम. पण धुंदी नेहमीच ) त्यांचा सल्ला ( अशा वेळी सारेच मित्र व त्यांचे सल्ले हितकर वाटतात ) मानून. मग बायकोशी खोटे बोलणे, त्यातून गुंतागुंत–बायकोने घर सोडण्याची धमकी देणे, शेवटी 'अनजाना पॅक्टोरिस' ही कुणी किरिस्तांव बाई नसून 'रोग' आहे हा शोध लागणे. सत्कार्यी द्रव्य दिले असल्याचा पुरावा "कोनशिले"च्या रूपाने समोर येणे. धुके वितळणे. 'हार्ट ट्रबल' संपले. 'पॅक्टोरिस'चा अवतार खलास! आपल्याच पावलांची ऐकू येणारी अभद्र 'चाहूल' खलास! शेवट गोड, सारेच गोड!!

'**वाजे पाऊल आपुले**' हे विश्राम बेडेकरांचे नाटक तसे रुपां-तरित! पण स्वतंत्र वाटावे इतके स्वतंत्रच असलेले नाटक!! नाटकाचे संवाद अतिशय रेखीव. नीटनेटके. सूचक समर्थ नाटक घेऊन आलेले! हे नाटक रूपांतरित आहे असे सांगितले नाही तर ते स्वतंत्र वाटेल ( काही भाग परका वाटतो. तेथेच ते 'उघडे' पडते ) पण एकाच चिंतेने व्यग्र झालेल्या, सतत त्याच छायेत वावरणाऱ्या माणसाच्या वागण्याबद्दल होणारी गुंतागुंत इथे चांगली रेखाटली आहे. त्यातून येणारा 'संशय' तर्कसंगत वाटतो. शेव-टच्या अंकातील घटनांना गति चांगली आहे. त्या अंकातील भगवंत–पत्नी–दोघांचीही चांगलीच कसोटी लागते. त्यात ती दोघे उतरतात. खूप गुंतागुंत–त्यामुळेच भरपूर करमणूक. हंशा आणि बेडेकरांच्या संवादातून येणारी असामान्य बौद्धिक 'एंजॉय-मेंट!' वाक्य न् वाक्य टिपून घ्या मंडळी. बेडेकरांची 'कीर्ति' ह्याबद्दल आहेच. ह्या नाटकाने ती पुन्हा एकदा सिद्ध केली आहे. ह्या नाटकात खटकतोय् एकच भाग! प्रत्येक अंकाचा शेवट अगदी योग्य ठिकाणी, नाट्यपूर्ण पद्धतीने झाला असे जाणवत नाही.

**ह्या नाटकाबद्दल प्रथम विश्राम बेडेकरांचे मन:पूर्वक अभि-नंदन! एक चांगले, सुखद नाटक त्यांनी मराठीला दिले आहे.**



दुसरे अभिनंदन दाजी भाटवडेकर यांचे! दाजींच्या मनावरले 'काकाजी'चे भूत एकदाचे उतरले म्हणायचे. मराठी नाटकाच्या दृष्टीने सुचिन्ह! 'भगवंत भुस्कुटे'च्या निमित्ताने दाजींनी 'स्वतंत्र' व 'अप्रतिम' भूमिका सादर केली–दिलखुलास अभिनंदन! दाजींच्या 'काकाजी'इतकाच 'भगवंत भुस्कुटे' मराठी मनात घर करून राहणार! मंगला संझगिरी ह्या गुणी अभिनेत्री! त्यांचे हे पुनरा-गमन वरदान ठरो. दामू केंकरे, अरविंद देशपांडे, जयंत सावरकर यांचीही कामे छान! छान!! एक 'सुविहित' नाट्यप्रयोग म्ह. वाजे पाऊल आपुले. "विश्राम बेडेकर" या नांवाविषयी नव्या अपेक्षा वाढविणारे मराठी नाटक! बेडेकर, नाटके हवींत हो तुमच्याकडून, चांगली नाटके हवीत.

## ज्वालेत उभी मी !

भारतीय नांवे घेऊन पण नखशिखान्त 'साहेबी' पोशाख ठेवून एका समर्थ विषयावरचे समर्थ लेखकाचे हे रूपान्तरित नाटक मराठीत आले आहे. 'टेनेसी वुइल्यम्स'च्या 'कॅट ऑन हॉट् टिन रूफ' ची मराठी आवृत्ती म्ह. "ज्वालेत उभी मी!" नाटकात खरा मामला 'साहेबी'. मूळ नाट्यविषयही बराचसा साहेबी. (आपल्याकडे 'तसले' प्रकार नाहीत असे मला म्हणायचे नाही. पण चोरून मारून. नाटकात हज्जारो प्रेक्षकांसमोर मांडण्याइतके ते प्रभावी नाहीत–नसावेत ) केस कापणे, वुइल, मळा, मळ्याची मालकी, त्यातून लक्षावधी रुपये वगैरे सर्व प्रकार त्यातूनच येतात. समलिंगी आकर्षण आणि त्यातून उद्भवणारे अनैसर्गिक व अनैतिक संबंध ह्यातून एका कुटुंबात उत्पन्न होणारा संघर्ष हा ह्या नाटकाचा विषय आहे. नाटकाचा नायक दिलीप (ब्रिक ) आणि त्याची पत्नी पिरोज ( मार्गारिट ) ह्यांचे कौटुंबिक जीवन उध्वस्त होते. कारण दिलीपचा मित्र राजू ह्याच्यावर ती 'अनैतिक संबंधाचा' आरोप करते व त्यामुळे संतापून तो तिच्यावर बलात्कार कर-ण्याचा प्रयत्न करतो. त्यात त्याचा अंत होतो. राजूच्या मृत्यूला पिरोज कारण होते ह्या कल्पनेने दिलीप तिच्याशी असलेले सारे संबंध तोडून टाकतो व सतत दारूच्या कैफात आपली व्यथा बुडवून टाकण्याचा प्रयत्न करतो. त्याची ही परवड पाहून आई-बाप अस्वस्थ होतात. आई 'मूल' न देऊ शकणाऱ्या सुनेवरच सारा दोष लादते. आईबापाचे दिलीपवर भारी प्रेम. पण तो तर दारूच्या नशेत. सून त्यांना आवडते, पण मुलाच्या व्यथा **त्यांना अस्वस्थ करतात. थोरला मुलगा केदार व सून बिंबा ही दोघं दिलीप पिरोजच्या ह्या मनस्थितीचा व डॅडीच्या आजाराचा**







फायद्रा घेऊन इस्टेट लाटण्याचा प्रयत्न करतात. पण डॅडीच्या वाढदिवशी 'आपल्याला मुलगा होणार आहे' ही गोड वातमी सांगून पिरोज तो डाव उघळून लावते. डॅडी, आईला खूप आनंद होतो. डिवचला गेलेला दिलीप 'माणसात' येतो आणि 'मुलाबद्दलची खोटी' बातमी खरी करून दाखविण्यासाठीं 'दोन उशा' जवळ येतात. नाटक संपते!! शेवटच्या 'सूचक' 'मॉंटाज्'चा ठसा मनावर उमटवून जाते! खोटी बातमी सांगून पिरोज सारे चित्र पालटून टाकते तो भागही झकास वठला आहे.

विषय हळुवार, नाजुक. पहिल्या अंकात 'हो-नाही' पलिकडे दिलीप बोलत नाही. बोलत राहते फक्त पिरोज. सेवा चौहान ह्यांनी अभिनय व आवाजाचे अनेक बारकावे दाखवून बोलणे साध्य करण्याचा चांगला प्रयत्न केला. पण एकच पात्र सारखे बोलत राहिल्याने माणसे कंटाळतातच! दुसऱ्या अंकात हे काम 'डॅडी' करतात. जयंत सावरकरांचा 'डॅडी' अप्रतिम वठला असूनही 'बोअर' होतेच. राजूला बोलते करण्याचा प्रयत्न फारसा यशस्वी होत नाही. बोलत राहतात डॅडी! शेवटच्या अंकातील 'डॅडी'ची गोष्ट मोठी सूचक आहे. पण ती 'भारतीय' मनाला कितपत रूचेल ही शंका. पिरोजचा 'गौप्यस्फोट' नाटयपूर्ण व उत्कंटा वाढविणारा! हे नाटक पाहिल्यानंतर एक गोष्ट मनाला जाणवते ती अशी की ह्या नाटकातल्या पात्रांची मूळ नांवे जर कायम ठेवली तर ते नाटक अधिक रूचेल, पटेल व पचेलही! अनुवादक जोगळेकरांनी एवीतेवी शब्दशः भाषांतर केले आहे. मग डॅडी ममी कायम ठेवून पिरोज–दिलीपचा हट्ट कशाला? हे "न हिंदु र्न यवनाः" कशासाठी?

प्रयोगाबद्दल 'अप्रतिम' हा एकच शब्द वापरतो. प्रा. भालवांनी 'नांव' कायम राखले आहे. सर्वात जास्त गुण द्यायला हवेत दिलीपची अवघड भूमिका सतत तीन तास एक विशिष्ट 'तोल' (बेअरिंग) राखून काम करणाऱ्या श्रीराम खरे याना! 'हाच दिलीप' हा हुंकार येत होता. पिरोजची व्यथा सेवा चौहान ह्या गुणी नटीनें चांगलीच साकार केली अभिनय, आवाज, हालचालीचा फरक ह्यातून ती साकारतच गेली. तिच्या व्यथेपेक्षा केदार बिवाच्या कारस्थानाने अधिक 'भाव' खाल्ल्याने तिची व्यथा काहीशी मागे पडली हे मात्र खरे! जयंत धर्माधिकारी (डॅडी) यांच्या भूमिकेचाही खास उल्लेख करायला हवा. दुसऱ्या अंकातला त्यांचा 'डॅडी' मनात घर करून आहे. केदार-बिवा, डॉक्टर-ठीक!! पोरे कशासाठी आणलीत? प्रकाशयोजनेचे कौशल्य वाखाणण्यासारखे! विशेषतः गॅलरी व खोली यातील फरक स्पष्ट करण्यासाठी केलेला वापर कसबी!

'प्रोग्रेसिव्ह ड्रॅमॅटिक' व भालवांचे अभिनंदन!! मूळ नांवे कायम ठेवून केला प्रयोग तर काय होईल? बघा पटलं तर!



# मधु इथे अन् चन्द्र तिथे!

'मधुचंद्रा'च्या कल्पनेने भारावून गेलेल्या दिनू खरे आणि त्याची पत्नी मालू यांच्या वाटयाला आलेल्या संकटांची खुमासदार(!) कथा 'मधुचंद्रा'त गुंफली आहे.

प्रेमभंग झाला की आत्महत्या, परीक्षेत अपेश की आत्महत्या अशा उठल्या सुठल्या आत्महत्त्या करणारांचा एक 'क्यू' दाखवून त्या पार्श्वभूमीवर दिनू खरेला जीवनाचा नवा संदेश दिला जातो (देणारा कोण? कुठला? तो पुन्हा कां दिसत नाही? त्या 'पॅच'चा चित्रपटाशी संबंध काय वगैरे प्रश्न विचारायचे नाहीत. संदेश चांगला होता. त्यामुळे दिनू खरे जगला. त्याचे प्रेम जमले व पुढची कथा घडू तरी शकली(!) सबंध चित्रपटभर तो फक्त प्रेमच करतो. पैसे नेमके कुठून येतात? मामा प्रेमळ आहे. पण पैसे दिल्याचा पुरावा नाही. तिकिटांच्या निमित्ताने मालू भेटते. ती 'बाला' पाहताच (तेहतिसाव्या वेळी –इति मामा) दिनूचा कलिजा 'खलास' होतो. पण गैरसमजाचे धुके येते. दिनू घरी येतो. ती मुलगी मुंबईला (की कुठे तरी) जाते. मग संगीत मास्तराची जाहिरात येते. नेमका दिनू मालूच्याच घरी! चांगल्या शिकवणीच्या स्वप्नात दंग असलेल्या दिनूला तिचे वडील आपल्या बेसूर गाण्याने जमिनीवर आणतात आणि 'गेट आऊट' म्हणतात. तरीही दिनू–मालू भेटतात–बोलतात. त्याची शिकवणी (कसली?) चालूच राहते. मामा मालूचे वडील गावी गेले हे पाहून (त्यांच्या नांवाच्या चिठ्या छापून) दिनू-मालूचे लग्न उरकतात (त्यांच्याच घरी) लग्न पार पडते. मग बाप येतो आणि पुन्हा 'गेट आऊट' म्हणतो. चित्रपटातला बाप संपतो. अत्तर-मोगऱ्याच्या गजऱ्याचा सुगंध घेऊन दिनूच्या घरी पहिली रात्र येते. पण मालकिणीचे नियोजन केंद्र (सॉलिड्) आडवे येते आणि मालूच्या ऐवजी मालकच सोबतीला येतात. वैताग! वैताग!! शेवटी दिनू मालूला घेऊन व मामांच्या नांवावर भाऊवहिणीचा पास घेऊन चंद्रगनरला मधुचंद्रासाठी निघतो. वाटेत एक टी. सी. (राजा राजवाडे) भेटतो (पेटलेलाच गडी–रेल्वेतले टी. सी. इतके 'प्रेमळ' व "सौजन्यशील" असतात का हो?) तो त्याना बळजवरीने वेळगांवी उतरून घेतो. (मंगळसूत्राचे महत्व याठिकाणी पटावे) मग मालू-राजा आणि दिनू-लैला 'गंमत' रंगते. तेवढ्यात बदमाष 'कन्हैया' म्हणून दिनूला (व साथीदार म्हणून) मालूला 'कोठडी'

मिळते ( वेगवेगळी ) पण खरा 'कन्हैया' मिळाल्याने प्रेमवीर 'कन्हैयाला' सोडून दिले जाते. मग चंद्रनगर. रात्री वेगवेगळ्या खोल्या. पुन्हा वैताग. पुन्हा कन्हैया. गैरसमज संताप. मग (खोटे) विषप्राशन व त्यातून खऱ्या कन्हैयाला (खरी ) अटक. मग बँक टु पॅव्हिलियन! घराला बाहेरून कुलूप आणि मग 'मधुचंद्र'!!

असा हा चित्रपट! प्रसंगनिष्ठ विनोदी मसाल्याने खचून भरलेला. ( विनोदात अतिशयोक्ति, सैल मूर्खपणामुद्धा गृहित धरावा. या चित्रपटात कसलाही 'ताण' नाही. गाणी सोडली तर–भलतीच कर्कश ! महेंद्र कपूरला मराठी चित्रपटात गायला लावलेच पाहिजे काय? गाणी चांगली होती. चालीही बऱ्या होत्या. ( एन्. दत्ता ) पण महेंद्र कपूरचा (काशीनाथ घाणेकरांच्या आवाजाला यत्किंचितही न जुळणारा ) आवाज! चित्रपटातली (दिनूला न मिळालेली ) शिक्षा प्रेक्षकांना!! दत्ता गोर्ले यांचे छायाचित्रण अप्रतिम! द्वंद्व गीते गाताना इतक्या उंच ठिकाणी व अवघड कड्यांवर उभे राहयलाच हवे काय? दिनूला फक्त प्रेमाचीच 'धाडसे' जमतात म्हणून की काय? काशिनाथ घाणेकर, उमा, श्रीकांत मोघे, राजा परांजपे, राजा पंडीत, गुलाब कोरगावकर ही मुख्य टीम!! चांगली–ह्यातही 'टाइपस्' असल्याने 'विनोद' भरपूर होतो. दोन्ही 'राजे' ( पंडीत-परांजपे )'ठसे' मारून जातात. हंसा! हंसा!! आणि विनोद खाऊन ( सध्या 'स्वराज्यात' दुसरे काय खाणार? ) लठ्ठ व्हा! तेवढेच आपल्या हातात आहे. ग्रामीण (तमाशा ) कथा आणि भरपूर रडारड ह्या मराठी फार्म्युल्यापेक्षा वेगळा चित्रपट "रिलीफ" म्हणून बरा इतकंच!!

—चित्रगुप्त

[ पान १० वरून--देशपांडे ]

त्यांच्यापेक्षा प्रतिष्ठेने वामनराव देशपांडे खचितच कमी नव्हते. एक मान्यवर सनदी हिशेब तपासनीस–की ज्या व्यवसायात सध्याकालात मान वर करायला अवसर मिळू नये (आणि मनात आणले तर पांच गवय्ये पोसायची ऐपत जोडावी, किंवा सूड घ्यायचा असला तर उत्पन्नदार गवय्याला चिमटीत पकडावा) अशा गृहस्थाने संगीत या विषयाला जीवनाचे सारसर्वस्व मानावे ही गोष्ट आदरणीय होती; पण थोर संगीतकाराला ज्या तऱ्हेने काळीज असावे लागते तसले क्षमाशील आणि उदार काळीज पाहून त्या क्षणी ती आठवण करून दिल्याबद्दल मी वरमलो.

आपले संगीतावरचे काही लिखाण तज्ज्ञाना वाचून दाखविताना आणि दुसऱ्याचे ऐकताना त्यांची तन्मयता पाहून घ्यावी. एकदा पं. भास्करबुवा बखले यांची मी लिहिलेली जीवनी त्याना वाचून दाखवीत असताना त्यांच्या कष्टमय आयुष्यातील काही प्रसंगी डोळे भरून आल्याकारणाने दोन तीन ठिकाणी या अत्यंत सहृदय कलावंताने ज्या वेळी मला रोखले त्या वेळी त्यांच्या सौहार्द्र अंतःकरणाची मला जाणीव झाली.

राज्य सरकार प्रणीत अनेक कमिटयांवर वामनराव सभासद आहेत. त्यात ते जीव ओतून काम करतात. विश्वविद्यालयीन अभ्यासक्रमात संगीताचा अंतर्भाव असावा यासाठी त्यांची कित्येक वर्षे धडपड चालू आहे. याविषयी विचार विनिमय करण्यासाठी विद्यापीठाच्या कुलगुरूंनी जे मंडळ नियुक्त केलेले आहे त्यात वामनराव सदस्य असल्याचे ऐकून बरे वाटले. त्यासंबंधीच्या आपल्या कल्पना ते मूर्त स्वरुपात आणतील यात संदेह नाही.

वामनरावांच्या घराण्यात त्यांचे वाडवडील संगीतात रस घेणारे होतेचे, पण त्यांचे सर्व बंधू आणि वहिणीही नादलुब्ध आहेत. गेल्याच वर्षी त्यांच्या एका बहिणीचे गाणे मी त्यांच्या घरी जाऊन ऐकले होते. श्री. वामनराव सडोलीकर त्याना व्यवस्थित तालीम देत आहेत.

**रोम रोम संगीतमय...**

कोणत्याही समारंभाच्या वा अन्य कारणाने वामनराव आणि त्यांचे बंधू हे सर्व एकत्र आले की, राजकारण समाजकारण, अर्थकारण यापेक्षा संगीतकारणावरच त्यांची बोलणी अधिक व्हायची. किराना घराण्याचा अभिमान सर्वानाच होता. थोरले बंधू आयुर्वेदाचार्य कै. पांडुरंगशास्त्री देशपांडे हे तर जाज्वल्य अभिमानी होते. संगीतावर वादंग होई. माझे खरे की तुझे खरे यावर हमरी तुमरी व्हायची. वामनरावानी आपले गाण्याचे घराणे बदलले म्हणून एकदा पांडुरंग शास्त्र्यानी एका वादात 'तुम्ही शूद्र आहात' अशा कडवट शब्दांचा अहेर वामनरावाना करून वादाचा समारोप केला होता.

आता हे वाण नंतरच्या पिढीच्या हातात गेलेले आहे. वामनरावांच्या कुटुंबासकट सर्व मुलाना संगीताचा कान आहे. रसिकता आहे. धाकट्या सतीशला स्वर आणि लयीची देणगी उपजत आहे. तो वडिलांप्रमाणे घराण्याचा पथिक होतो की, नवीन घराणे जन्माला घालून घरंदाज गायकीच्या पुढच्या भागात एका नव्या प्रकरणाची भर घालतो ते आता पाहायचे आहे.

या लेखाचा समारोप करताना वामनरावांच्या वयाला आता कितवे वर्ष चालू असावे असे विचार मनात आले, आणि आपल्या घरंदाज गायकीच्या पूर्वकथनात '१९५८ च्या डिसेंबरमध्ये वयाच्या बावन्नाव्या वर्षी आयुष्यातले पहिले व्याख्यान मी दिले' असा उल्लेख आढळला. त्या हिशेबाने ते आता एकसष्टीच्या उंबरठ्यावर आहेत. त्यांचे समवयस्क, इष्टमित्र, सगेसोयरे त्यांची एकसष्टी साजरी करोत वा न करोत, पण कित्येक दिवस त्यांच्या संगीतसाधनेबद्दल मनात असलेला हा आदर व्यक्त करताना अभावितपणे जमून आलेल्या या योगायोगाबद्दल मी त्यांचे शुभचिंतन करीत आहे या जाणिवेने मन भरून आले.

●●●

# जय कुटुंब-नियोजन !!

**'दीपावली' च्या मार्च अंकात "भाग्याची गोष्ट" ही कथा प्रसिद्ध झाली होती. (वा. रा. सोनार) योगायोगाने तसलाच पण अधिक भीषण प्रकार सोलापूरला घडला. डॉ. अ. रा. गोडसे यांचे पत्र आणि 'ती' घटना सादर करीत आहोत. जय कुटुंब–नियोजन !!**

श्रीयुत,

संपादक दीपावली यांस

स. न. वि. वि.

आपल्या मार्चच्या दीपावली विनोद विशेषांकात वा. रा. सोनार यांची भाग्याची गोष्ट वाचली. तशीच अगदी सत्य घटना सोलापूर येथे घडली आहे. त्या बाबतचे 'संचार' या वर्तमान पत्राचे गुरुवार ४।५।६७ चे कात्रण सोबत जोडले आहे.

लेखकांच्या द्रष्टेपणाचे हे एक उत्तम उदाहरण आहे.

आपला,

**सोलापूर** (डॉ). **अ. रा. गोडसे**

सोलापूर दि. ३ मे– येथील जिल्हा परिषदेच्या कार्यालयातील कुटुंब नियोजन शस्त्रक्रिया केंद्रात एक अजब घटना तीस एप्रिल रोजी घडली. एका अविवाहित नरसिंगगिरजी मील मजूरावर कुटुंब नियोजनाची शस्त्रक्रिया करण्यात आली व त्या मजूरास हार्नियाचा रोग असताना त्याचेवर शस्त्रक्रिया मात्र तो ब्रह्मचारी असताना कुटुंब नियोजनाची झाली त्यामुळे डॉक्टर वर्गात व जनतेत हा चर्चेचा विषय झाला आहे.

हा गिरणी मजूर हार्नियाचे ऑपरेशन करून घ्यावे म्हणून सिव्हिल हॉस्पिटलकडे जात असताना परिषदेजवळ एका नोकराने कुटुंब नियोजन शस्त्रक्रिया केंद्रात ऑपरेशन फुकट होते व पैसे मिळतात असे सांगून त्यास परिषदेच्या उपरोक्त केंद्रातील डॉक्टरापुढे उभे केले. या मजूरांनी नोकराच्या सांगण्यावरून डॉक्टरापुढे जबाब देताना लग्न झाल्याचे व मुले असल्याचे सांगितले. ऑपरेशन फुकट होण्यासाठी असा जबाब द्यावा लागतो हे त्या मजूरास पढविण्यात आल्यामुळे तसा जबाब दिल्यानंतर डॉक्टरानी तावडतोब शस्त्रक्रिया करून सहा दिवसाची रजा मंजूर करावी असे सर्टिफिकेट कामगार विमा योजनेच्या डॉक्टराला दिले.

संतती प्रतिबंधक शस्त्रक्रिया करून घेतल्यामुळे सरकारी नियमाप्रमाणे परिषदेच्या शस्त्रक्रिया केंद्रातून जेवढे रुपये मिळाले ते त्या मजूरानी घेतले. ऑपरेशन झाल्यामुळे कलेक्टर कचेरीतून घरी येताना त्यास चक्कर आली म्हणून तो एका झाडाखाली पडला. त्याच्या खिशातील दहा रुपये कोणी तरी काढून पळविले. तो शुद्धीवर येताच त्याला पैशाची चोरी झाल्याचे व ज्यांनी शस्त्रक्रिया करून घेण्यास सांगितले तो नोकर बेपत्ता झाल्याचे दिसून आले.

सदर मजूर कामगार विमा योजनेच्या डॉक्टरकडे सहा दिवसाच्या रजेसाठी परिषदेच्या डॉक्टराचे सर्टिफिकेट घेऊन आला तेव्हा हार्नियाचे ऑपरेशन करण्याऐवजी या ब्रह्मचारी कामगाराचे भलतेच ऑपरेशन करून त्याच्या भावी संसारातील वैवाहिक आनंद लुटण्याची कायमची बंदी मात्र झाल्याचे दिसले.

जिल्हा परिषदेच्या कुटुंब नियोजन केंद्रातील इष्टांक पूर्ण करण्याची घाई झाली का दहा रुपये चोरण्यासाठी मधल्या दलाली नोकरांनी हे घडवून आणले याची शहरात चर्चा चालू आहे. संचारच्या प्रतिनिधीने सदर मजूराची मुलाखत घेऊन वरील घटनेची माहिती पडताळून पाहिली. माझे आता लग्न कसे होईल व संसारी जीवनास कायमचा मुकलो काय ? अशी तो मजूर भेटेल त्याला घडलेली हकीकत सांगून विचारणा करीत आहे.

जिल्हा परिषदेच्या कुटुंब नियोजन केंद्रावर डॉक्टरापुढे जो जबाब दिला गेला तो सत्य आहे किंवा नाही याची खात्री करून न घेता शस्त्रक्रियेची घाई इष्टांकपूर्ण करण्यासाठी करण्यात आली काय अशी विचारणा शहरातील जाणकार मंडळी करीत आहेत.

केवळ गरिबीमुळे हार्नियाच्या शस्त्रक्रियेचे पैसे भरणे शक्य नाही व परिषदेच्या कुटुंब नियोजन शस्त्रक्रिया केंद्रात फुकट शस्त्रक्रियेसाठी हा जबाब द्यावा लागतो तोच दिला पाहिजे असे शिकविल्यामुळे मी तसा जबाब दिला असे त्या मजूरानी संचार प्रतिनिधिजवळ सरळमनाने सांगितले. हार्नियाची शस्त्रक्रियाच झाली आहे असे मला वाटले पण झाला प्रकार अजब व संतापजनक ठरला आहे असेहि तो म्हणाला.

●●●

# कोलकोत्तर बृष्टी

## [कलकत्ता येथील पावसाळ्याचे वर्णन]



–वि. ज. पेठे

**हे लिहिताना सुद्धा पावसाचे हे एवढे मोठे थेंब पडत आहेत. पण चक्क उनही आहे. जमिनीतून वाफारे येत आहेत, त्यामुळे अंगाला घामाच्या धारा लागल्या आहेत. बिमलबाबू खिडकीतून बाहेर डोकावत म्हणत आहे, "की चोमोत्कार."**

---

**जगात** ज्या काही विचित्र वस्तू अथवा गोष्टी, ज्या नसल्यास हव्याशा वाटतात व मिळाल्यास नकोशा होतात, त्यात कलकत्ता येथील पावसाळ्याचा अग्रक्रम जरी नाही तरी बराच वरचा नंबर लागेल. पूर्व भारताच्या ह्या विशाल नगरीतला पाऊस ही काय चीज आहे हे प्रत्यक्ष ज्याने त्याचा अनुभव घेतला आहे त्यालाच कळू शकते. ज्याना तो मिळालेला नाही किंवा घेता आला नाही त्याना येथील पावसाळ्याचे 'ट्रेलर' पाहिल्याचा आनंद मिळेल अशी आशा आहे.

साधारणपणे येथील "वृष्टि" ( पावसाला बंगाली प्रतिशब्द) चा सीझन जूनमध्ये तिसऱ्या आठवड्यात सुरू व्हावा असा हवामान तज्ज्ञांचा संकेत आहे. परंतु पाऊस त्या संकेताला खुशाल झुगारून देतो. त्याचे आगमन अगदी त्याचे लहरीवर अवलंबून असते. तो कधी जूनचे सुरुवातीलाच सुरू होईल किंवा जुलै अर्धा संपला तरी दर्शन देणार नाही. त्याचप्रमाणे त्याला उन्हाळा किंवा हिंवाळा ह्या सीझनचेही काही महत्व नाही. तो जितक्या नेटाने आषाढ-श्रावणचे महिन्यात येतो तेवढ्याच जोमाने वैशाखाच्या रणरणत्या उन्हात किंवा मार्गशीर्ष-पौषच्या मी मी म्हणविणाऱ्या थंडीच्या दिवसात पण येतो.

व्यक्तिशः मला उन्हाळ्यात येणारी "वृष्टि" खूप आवडते. त्याचे कारण माझ्यासारखा ज्याना उष्माचा अतिशय त्रास होतो त्याना चटकन् उमगून येईल. उन्हाळ्यात तापमान केव्हाही अति उंच गेले (म्हणजे १०३° पासून १०६–१०७° पर्यंत ) व हवेत आर्द्रतेचे प्रमाण ९०% ते १००% झाले की खुशाल समजावे की काही तासांचे अवधीतच वृष्टि होणार. हा संकेत मात्र इतका ठरून गेला आहे की त्यात जर काही चूक झाली तर त्यावर लगेच घरोघरी, गल्लोगल्ली इतकेच नव्हे तर वर्तमानपत्रातून चर्चा सुरू होते. यंदाचेच उदाहरण पहाना. एप्रिल महिना, ज्याला येथे Norwester Month किंवा बंगालीमध्ये 'कालवैसाखी मास" म्हणतात, दोन-तृतियांश उलटून गेला तरी पावसाचे नांव नाही. सर्व लोक, विशेषतः बंगाली बाबू फारच काळजीत पडले व "ए टा कि कोरे होलो" (असे कसे झाले) असे बोलू लागले व पुढे येणाऱ्या दिवसांचे विचारानेच त्यांचे काळजात चर्र झाले. वर्तमानपत्रात "वाचकांचा पत्रव्यवहार" ह्या सदरात चर्चा सुरू झाली. शेवटी पर्जन्यराजाला दया आली व १९ एप्रिल रोजी त्याने पहिला शिडकावा टाकला.

उन्हाळ्यातील पावसाळा हा मोठ्या लव्याजम्यानिशीच येतो म्हणना. आधी एक जोराचे अंधड ( इंग्रजीत Squall व बंगालीत "कालवैसाखी" ) येते. साधारण वैशाखात ह्या हवेचा जोर असतो व पुष्कळवेळा आपल्या वेगात जीर्णशीर्ण घरे, वृक्ष इत्यादि उलथून पाडण्याची तिला संवय असते. तिच्यामुळे वातावरणात एकदम थंडावा होतो. हळू हळू टिप टिप पावसाचे थेंब पडू लागतात. आकाशात काळेकुट्ट ढग आधीच जमा झालेले असतात व त्यांचा व विद्युल्लतेचा नेत्रदीपक खेळ ढगांचे गडगडाटाचे तालात सुरू होतो. शहरात नुकत्याच आलेल्या अजनबी बाबूला असे वाटते की "अरेच्या, पावसाळा सुरू झाला." काही अवधीतच पावसाला अंगात आल्यासारखे होते व तो थैमान घालू लागतो. अशा वेळी ही बरखाबहार नसून रणचंडिका आहे अशी भावना व्हावयास लागते. सर्व रस्ते पाण्याखाली जातात. वाहतूक विस्कळीत होते व नको तो पाऊस, असे थोड्याच वेळापूर्वी आशाळभूत नजरेने आकाशाकडे डोळे लावून बसणाऱ्याला वाटावयास लागते. हा लेख लिहीत असताना सुद्धा एवढाल्या थेंबांचा पाऊस पडत आहे व चक्क उन पडले आहे. जमिनीतून वाफारे येत आहेत व त्यामुळे अंगातून स्वेदगंगा दुप्पट जोराने वहात आहे. माझा सहकारी बिमलबाबू खिडकीतून बाहेर डोकावत "कि चोमोत्कार" ( काय चमत्कार म्हणजे आश्चर्य आहे ) असे उद्गार काढीत आहे.

पावसाळ्यातला पाऊस आपल्या कोंकण किंवा मद्रास पट्टीकडे पडणाऱ्या पावसासारखाच असतो. फक्त फरक एवढाच की वाता-







वरण अतिशय भयानक होते. तसेच मेघगर्जना पण तारसप्तकातील असते. हिंदीमधील "जो गरजते है वो बरसते नही" ही उक्ति येथे खोटी ठरते. मेघराज चांगलेच गरजतात व बरसतात पण.

थंडीमध्ये पाऊस येतो तो बराच सौम्य असतो. कारण तो क्रिकेटषौकिन असतो. दुरंगी, तिरंगी किवा इतर कसलाही 'रंगी' सामना असो, तो पाहण्यास पाऊस अवश्य येतो. त्यामुळे खेळाडू व प्रेक्षक यांचा मात्र विरस होतो, हे तो विसरून जातो. पुष्कळ वेळा त्याने येथे भारतीय संघाला कसोटी सामन्यात वांचविले आहे—पराजयापासून—हे लक्षात घेतले म्हणजे त्याचे उपकार मोठेच आहेत याची खात्री पटते. सध्या हाच पाऊस तर ब्रिटनला गेलेला नाही ना, अशी एक शंका उगीचच येते. क्रिकेट सामन्याचे दिवसात प्रेक्षक वर्तमानपत्रातील "आज स्वच्छ हवा राहील" अशा भकिताना न जुमानता खुशाल छत्री बरोबर बाळगतात. फुटबॉलचे सामने मात्र पावसाशिवाय रंगतच नाहीत. तरुण तरुणी, आबालवृद्ध पावसात बसून फुटबॉलचे खेळाचा मनमुराद आनंद लुटत असतात.

पाऊस सुरू झाला की लगोलग ट्रॅम्सचालक असतील त्या ठिकाणी गाड्या थांबवून ठेवतात. रुळावरून म्हणे ट्रॅम घसरेल ह्या भीतीने. अशावेळी पावसाच्या माऱ्यापासून बचाव म्हणून ट्रॅम्समधील शटर्स खाली ओढावे, तर ते बेटे सर्व प्रयत्नांना दाद देत नाहीत. उन्हाळयात मात्र हटकून खाली येऊन अडकून बसतात. क्यू पद्धत नसल्यमुळे ट्रॅममध्ये आधीच गर्दी असते व इतर वाटसरू पण आडोशाला म्हणून उभ्या असलेल्या ट्रॅममध्ये शिरतात. आतील उतारूना आपल्या दुखात पार्टनर आले म्हणून सात्विक आनंद होतो. तर काही त्यांचे कपडे आंगतुकांमुळे ओले होतात म्हणून रागावतात. परंतु त्याला इलाज नसतो.

साधारण पंधरा मिनिटे जोराचा पाऊस पडला की सर्व रस्त्यांतून पाणी जमते. अशावेळी आपण बॅंगकॉकमध्ये तर नाही ना असे वाटू लागते. काही उत्साही मुले गल्ल्यांतून ( ज्यांना एखाद्या नदीचे स्वरुप लाभते ) होड्या फिरवू लागतात. अशावेळी कार्यजागरूक लोक त्यांतूनमुद्धा कचेरीत हजर राहण्याचा प्रयत्न करितात. तर काही आकाशात मेघ एकत्र होऊ लागताच खुशाल फेंच रजा घेतात. रस्त्यांतून पाणी जमा झाले की ठिकठिकाणी असलेली मॅनहोल्स कॉर्पोरेशनचे कर्मचारी उघडून ठेवतात. हेतु हा की जादा पाणी त्यात सामावले जावे. परतु बहुतांशी मॅनहोलचे ठिकाणी एखादे धोका-निदर्शक चिन्ह उभारण्यास विसरले जाते व मग त्यात पाण्यातून वाट काढीत जाणारे लोक अडकतात. नशीवच बलवत्तर असेल तर ते वांचतात. नाहीतर आतल्या आत वहात जातात व चार पाच दिवसानी कुठेतरी कलेवर पडलेले आढळून येते. कॉर्पोरेशन पण जनसंख्या कमी करण्यास अशा प्रकारे थोडाबहुत हातभार लावते.

कलकत्ता कॉर्पोरेशन व पाऊस यांचा जिव्हाळयाचा संबध आहे म्हणाना. महापालिकेच्या प्रत्येक सुधारणेला शह देण्याची पाऊस जणू वाटच पहात असतो. ठिकठिकाणी भगदाड पडलेला रस्ता महापालिकेने मनावर घेऊन एकदा का दुरुस्त केला की त्यानंतर येणाऱ्या प्रथम पावसामुळे तो पूर्वीपेक्षा सुद्धा भयाण अवस्थेला येऊन पोहोचतो. शहरात एका ठिकाणी रेल्वे ओव्हरब्रिज आहे. त्याखालील रस्ता उंचसखल असल्याने पावसाची जरी एक साधारण सर आली तरी ब्रिजचे दक्षिणेला पाणी सांचत असे व बस, ट्रॅम इत्यादि वाहतूक विस्कळीत होत असे. महापालिकेच्या हुषार इंजिनियर्सनी तो रस्ता रुंद व समान करण्याचे मनावर घेतले. त्या भागातील रहिवाशांना हायसे वाटले व त्यांनी, शेवटी काही का होईना पण एकदा महापालिकेला सुबुद्धि सुचली, म्हणून मनातून दुवा पण दिला. रस्ता लवकरच रुंद व समान झाला. नवीन सामग्री वापरल्यामुळे त्याचे सौंदर्य पण वाढले. परंतु हाय! — पहिल्याच पावसाने लोकांच्या तोंडचे पाणी पळाले आता ब्रिजचे दोनही बाजूला भरपूर पाणी सांचू लागले व परिस्थिती पूर्वीपेक्षा गंभीर झाली. त्यावर दुसरा काही तोडगा महापालिकेच्या कारागिराना सुचलेला दिसत नाही कारण ही परिस्थिती गेली काही वर्षे अव्याहत चालू आहे.

आपणास आठवड्यातून फक्त रविवारीच रजा असते. त्यादिवशी आपण चित्रपटास किवा कुणा परिचित मंडळीकडे चहाचे आमंत्रण स्वीकारले आहे. अशावेळी पाऊस पडावयास सुरुवात झाली म्हणून आपल्या सौ. व मुले खट्टू झाली आहेत. परंतु चिंतेचे कारण नाही. खुशाल बाहेर पडा. शेजारील पांचसहा इमारती सोडल्यावर तुम्हाला आढळून येईल की पावसाचे कार्यक्षेत्र फारच मर्यादित आहे. कारण पुढे पाऊस तर नसेलच पण चक्क ऊन पडलेले असते. अशा विचित्र परिस्थितीमुळे पुष्कळवेळा मजेदार घोटाळे उपस्थित होतात. माझा एक मित्र आपला अनुभव निवेदन करीत होता. काही कामानिमित्त तो उत्तर कलकत्त्यात गेला होता. त्यादिवशी आभाळ अगदी स्वच्छ होते. शामबाझार विभागात गेल्यावर त्याला सर्वंकडे जलप्लावन झालेले दिसले. येथे चांगलाच पाऊस पडलेला दिसतो आहे असे वाटले, व आता यातून पुढे कसे जावयाचे, या विवंचनेत तो पडला. बसमधून महत्प्रयासाने डोके बाहेर काढून आकाशाकडे त्याने पाहिले, तो आकाश स्वच्छच मग तो आणखीनच स्तिमित झाला. नंतर असे समजले की त्या विभागात पिण्याचे पाणी वाहून नेण्याऱ्या पाईपास दहा फूट लांब भगदाड पडले होते व त्यामुळे तो भाग जलमय झाला होता.

काही काळापूर्वीचीच गोष्ट. दिवसभर उकाड्याने हैराण झाल्याने सायंकाळी मस्तपैकी स्नान करून बैठकीत आलो, व साढेसातची बंगाली खोबोर (वार्ता) ऐकली म्हणून रेडिओ लावला. थोड्याच वेळात आश्चर्याचा धक्काच बसला. वार्तानिवेदिका सांगत होती "कलकत्ता येथे आज खूप जोराचे वादळ होऊन मुसळधार पाऊस पडला. कित्येक वृक्ष उन्मळून पडले व वाहतूक विस्कळीत झाली." आम्ही एकमेकांचे चेहऱ्याकडे पहातच राहिलो. दुसरे दिवशी वर्तमानपत्राने ह्या बातमीस दुजोरा दिला. आमचे कचेरीतील बिमलबाबू त्यांचे निवासस्थानाचे चहूबाजूला पाणीचपाणी झाल्यामुळे आले नव्हते.

●●●

# गरगर फिरे विमान



_स्क्वा. लीडर एन. आर. बत्रा

**विमानानी गिरक्या देणारे जोरदार वारे ढगांच्या पोकळीतून वाहत असले की वैमानिकाना ब्रह्मांड आठवते. आणि पावसाळ्यात वादळी ढग म्हणजे मृत्यूशीच झूंज असते. ती कशी....?**

**'आणि** आता हवामानाचा अंदाज' हे शब्द कानी पडले की आपण रेडिओ बंद करतो, व पुढच्या उद्योगाला लागतो. त्याचवेळी थोड्याच वेळात उड्डाणासाठी सिद्ध होणाऱ्या वैमानिकाचे सारे चित्र त्या अंदाजावर केंद्रित झालेले असते. त्याच्या हातात असतो. 'वेदर चार्ट'. हवेचा कमी-अधिक दाब, ढगांची घनता–विरलता, तपमान, वाऱ्यांचा वेग व दिशा हे सारे त्या तक्त्यात नोंदलेले असते. पावसाळ्यात तर त्याला वेदर फॉरकास्टकडे विशेषच लक्ष पुरवावें लागते. कारण ढगावर आरूढ होणारे विमान जमिनीवरून कितीही मोहक वाटत असले, मानवाने निसर्गावर केलेली मात असा अहंकार फुलत असला, तरी प्रत्यक्षात मात्र वैमानिकांचे दृष्टीने वादळी ढग आणि गारा म्हणजे साक्षात् यमदूत भासतात. त्यांचा प्रतापच तितका भयंकर असतो.

उड्डाणापूर्वी वैमानिकाला वेदर-चार्ट दिला जातो. तसेच उड्डाणाच्या काळात, आणि विमान उतरवितानाही इतर संदेशाप्रमाणे घटकोघटकी बदलणाऱ्या हवामानाबाबतही सुचना व अंदाज कळविले जातात. तरीही वादळी हवामानातून किंवा गारांच्या तडाक्यातून विमान् सहीसलामतपणे नेणे फार कठीण असते. अनुभव आणि सराव याच दोन गोष्टीनी वैमानिक त्या संकटाला यशस्वीपणे तोंड देऊ शकतो. कित्येकवेळा खाली उतरताना, उंची गाठताना किंवा अंतराळातील अंतर कापताना ढग, धुके, हिमवर्षाव यामुळे वैमानिकाला दोन हातापलिकडचे दिसणेही अशक्य होते. अशावेळी इन्स्टरुमेंटफ्लाइंग म्हणजेच ब्लाइंड-फ्लाइंगनेच विमान चालवावे लागते. ब्लाइंड-फ्लाइंग म्हणजे विमानातील विविध व विशिष्ट उपकरणांचे साह्याने, आणि वेळोवेळी मिळणाऱ्या रेडिओसंदेशांचे आधारे विमान चालविणे. विशेषत: पावसाळ्यात भारतीय हवामान सगळीकडेच इतके लहरी असते की इन्स्ट्रुमेंटल फ्लाईंगमुळेच विमान चालविणे शक्य होते.

आपला भारत देश समशीतोष्ण कटिबंधात असल्याने उत्तर किंवा दक्षिण ध्रुवाचे जवळील राष्ट्रांमध्ये वैमानिकाना वारावादळाच्या ज्या आपत्तीना तोंड द्यावे लागते, त्या सर्वस्वी वेगळ्या असतात. त्या देशांतील अंतराळात एकतर अति शीत किंवा अत्यंत उष्ण हवेचे प्रवाह फिरत असतात. त्यामुळे धुके वा बर्फ यांचे पट्टे मैलोन्गणती पसरलेले असतात किंवा आकाश लख्ख तरी आढळते. तसेच पावसाळी ढगांची लांबी–रुंदी व घनता (Depth) प्रमाणशीर असते. तिकडेही तुफान वादळे होतात, नाही असे नाही. तरीपण पन्नास एक हजार फूट उंचीवरून विमान चालविणे हे शक्य असते. दुसरे आल्प्स व अन्य पर्वतराजींच्या जवळून जाताना मात्र कमालीचे कौशल्य व सावधगिरी बाळगावी लागते. धुके वा बर्फ असल्यास जमिनीवरून अतिशय प्रखर प्रकाशझोत सोडण्यात येतात व त्यांचे साह्याने वैमानिक विमान उतरवू शकतो. 'लँडिंग ऑन बीम' असे त्या पद्धतीला म्हणतात.

आपल्याकडे मात्र परिस्थिती वेगळी असते. सबंध पावसाळ्यात साधारणपणे दहा ते तीस हजार फूट उंचीच्या दरम्यान सदैव कोठेना कोठे प्रचंड वादळी ढग एकवटत असतात आणि तेही वाऱ्याने सारखे ढकलले जात असतात. अशा त्या वादळी ढगांतून विमान बाहेर काढणे हे महाकठीण कर्म असते. ज्या उंचीवरून विमान चालले असेल त्यापेक्षा अधिक उंचीवर ढग असल्यास त्यांचेही वर जाणे. हा एक मार्ग किंवा विमानाच्या उंचीच्या पातळीवरच तसे ढग असल्यास विमान खूप खाली आणणे हे दोन मार्ग वैमानिकासमोर असतात. त्यातही परिस्थिती अशी असते की ढगांच्या त्या ढिगाऱ्यात ( मास ) पोकळी असते. त्यातून प्रचंड दाबाचे व वेगाचे वारे वहात असतात. त्यामुळे विमानाला कोणत्याही परिस्थितीत वाऱ्याच्या सणसणीत थपडा तर बसतातच. त्याशिवाय वाऱ्याच्या गतीमुळे एक तर ते वरवर तरी ढकलले जाते किंवा खाली भिरकावले जाते. सक्शन पंपातून हवा खेचली तसे विमान खेचले जाते. त्यातच अतिशय प्रखर दाबाच्या विजेचा थयथयाट सुरू असतो. त्यामुळे डोळे सारखे दिपत असतात. आणि दुर्दैवाने विजेचा लोळ विमानावरच आदळला की साराच कारभार आटोपला. १९६७ सालात मे महिन्यात असे दोन अपघात युरोपमध्ये घडल्याने दोन प्रवासी विमाने व त्यातील उतारू प्राणांस मुकले होते. अर्थात असे प्रकार अपवादात्मकच.

[पृष्ठ ५८ वर]



अखेर
'फुगा'
फुटला

## युद्ध होणार ! झाले ! ! संपले(ही)

**अरब** राष्ट्रांचे शिल्पकार, सर्वेसर्वा, थोर मुत्सद्दी ( बाकीच्या सर्व चांगल्या विशेषणांसाठी श्रीमति इंदिरा गांधी यांची मुलाखत घेणे ) वगैरे वगैरे विभूषणांनी भूषविले गेलेले नासेर यांनी गेल्या पंधरवड्यात मोठी धमाल उडवून दिली. प्रतिदिवशी त्यांची नवी नवी ( युद्ध ) घोषणा होत होती. अकाबाचे आखात त्यांनी रोखले. तिरानची सामुद्रधूनी हा अरब राष्ट्रांच्या मालकीचा जलमार्ग आहे. सुवेझ कालवा बंद करणार, तेलसाठे उडवून देणार. तेल पाश्चात्य ( युद्धखोर ) राष्ट्रांना विकणार नाही. इस्राइलचे अस्तित्व नष्ट करणे हेच आमचे जीवितकार्य अशा गर्जना-घोषणांनी आकाशात बराचसा धुरळा उडाला. पानिपताच्या वेळी जशी विविध सरदार-सेनापतींना आमंत्रणे जात तशी अरब राष्ट्रांना गेली आणि मग विविध अरब राष्ट्रांच्या 'सेना' निघाल्या' अशा वार्ता येऊ लागल्या. युद्ध अटळ आहे. होणार असे सारेजण बोलू लागले. "परराष्ट्र नीति" हा आपणा मंडळींचा फारच जिव्हाळ्याचा व नाजुक विषय! आणि नासेर हा (शेख अब्दुल्लांप्रमाणेच) पंडितजींपासूनचा जिव्हाळ्याचा विषय!

त्यामुळे इस्रायल नष्ट करण्याची घोषणा केल्यानंतरही ( व ती आमच्या शांतता व सहअस्तित्व ह्या धोरणात बसत नसतानाही ) आम्ही नासेरची भक्कम वकिली केली. अरबांच्या छळांच्या सुरस आणि सरस अरबी कथाही आम्ही आम जगाला ऐकविल्या आणि इस्राइलच्या नांवाने आम्ही कडाकडा बोटे मोडली व त्याचे मेल्याचे तळपट होवो असा 'बायकी' ( स्त्री पंतप्रधान असल्यावर आम्ही दुसरे काय करणार? ) शापही दिला. पण आमच्यायेवढा भक्कम पाठिंबा –सॉलिड पन्नास कोटींचा ( कदाचित थोडा आकडा वाढवित ) पाठिंबा असतानाही आणि अरबी वाघाने येवढ्या डरकाळ्या फोडल्या असतानाही अखेर युद्ध झाले. धर्मयुद्ध, जेहाद वगैरे मोठ्या नांवाने ही असली युद्धे नेहमीच लढली जातात. नाहीतर 'संरक्षणात्मक' हेतूने लढली जातात. हे युद्ध कुणी सुरू केले ह्या विषयात अजून एकमत झालेले नसले तरी दिल्लीत बसून आमच्या पंतप्रधान व परराष्ट्र मंत्र्यांची मात्र खात्री पटली आहे की, हे युद्ध त्या युद्धखोर इस्राइलने सुरू केले आहे, तो 'आक्रमक' आहे. (मग कुणीतरी 'लाहोर'चा दाखला लोकसभेत दिला आणि मोठी पंचाइत करून टाकली ) पण रक्त ओकून, घाम गाळून, अपार कष्ट करून, एकात्म राष्ट्रवाद कसा सशक्त व समर्थ असतो हे दाखविणाऱ्या आणि वाळूतून नंदनवन उभे करणाऱ्या इस्राइलने आपल्या अस्तित्वालाच चूड लावायला निघालेल्या नासेरचे आव्हान स्वीकारले. आणि फक्त ७९९३ स्के. मैलाच्या ह्या भूभागाने एका महाप्रचंड अशा अरब सामर्थ्याला जरब बसवील असा "असामान्य" पराक्रम करून दाखविला. ज्यूंच्या पराक्रमाला आजच्या जागतिक राजकारणात तोड नाही. असामान्य निर्धार, कुशल राजनीति, संघटना, अत्याधुनिक शस्त्रात पारंगतता आणि राष्ट्रनिष्ठा ह्याच्या जीवावर एक लहानसा देश हा पराक्रम करू शकला. जॉर्डन, सीरिया व इजिप्त ह्या तीन मुख्य आघाड्या होत्या. त्या तीन्ही आघाड्यांवर त्यांनी ज्या पद्धतीने लढाई दिली ती लष्करी तज्ञांच्या मताने परिपूर्ण ( परफेक्ट) होती असे वाचनात आले. 'प्रत्याक्रमण हेच संरक्षण' हा युद्धशास्त्रातला एक फार मोठा सिद्धांत मानला जातो. लाहोरच्या वेळी आमच्याही सेनापतींनी तो आचरला. अशावेळी पहिली गोळी कोणी झाडली ही चर्चा अनाठायी, अप्रस्तुत व वांझोटी आहे. आम्ही लाहोर आघाडी उघडून हेच केले. ते युद्ध शास्त्र व देशाचे संरक्षण ह्या दोन्ही दृष्टींनी आवश्यक होते. ज्यूंच्या जीवनमरणाचा प्रश्न उभा राहिला होता. साऱ्या नाड्या आखडल्या जात होत्या. अशावेळी जे घडले ते अपरिहार्य होते. कुठल्याही स्वाभिमानी अस्मितेच्या राष्ट्राने हेच केले असते. निषेध खलित्यांच्या राजकारणात जन्म घालविलेल्या राष्ट्राने ह्या बाबतीत इस्राइलला वाकुल्या दाखविण्याने स्वतःचे मात्र हसे करून घेतले आहे. तेही केवळ कुणीतरी आम्हाला काहीतरी म्हणतो म्हणून! आमची परराष्ट्र नीति अखेर ठरवते कोण? पाकिस्तान? रशिया? अमेरिका की इंग्लंड? की सर्वेसर्वा नासेर? "आम्ही अरबांच्या विरुद्ध आहोत असे पाकिस्तान म्हणते" म्हणून आम्ही येवढी (मसा-

नींच्या शब्दात ) चपराशिगिरी केली काय? वास्तविक आम्ही रशिया–अमेरिकेनेसुद्धा जेवढा संयम पाळला तेवढा तरी संयम पाळायला काही हरकत नव्हती. सहावे आरमार खडे होते. इस्राइलला अमेरिकेने पैसा दिला होता. संरक्षण दिले होते आणि तरीही अमेरिका तटस्थ राहिली. 'युद्धबंदी'चा आग्रह तिने धरला. अरबी घोषणा फुसक्या ठरल्या व त्यांची अवघ्या ४८ तासात परवड झालेली पाहताच रशियानेही युद्धबंदीचा नेट लावला. पण आम्ही मात्र नासेर जणु आमच्या (घट्ट) रक्ताचा भाऊ असल्याच्या कैफात (होय! कैफच म्हणतो मी. या विषयातली सारी भूमिका नासेर-मॅनिया झाल्यासारखीच झाली व होत आहेत हे खेदाने म्हणावे लागते ) सारी भूमिका वठविली आहे. गाझा पट्टीतल्या भारतीय सैनिकांच्या मृत्यूबद्दल आम्ही इस्राइलला दोष देतो. पण ते सैन्य काढून घेऊन युद्धमान सेना समोरासमोर उभ्या करणाऱ्या ऊ थाँट व युनो यांना आम्ही जबाबदार धरीत नाही. तो निर्णय आमसभेने घ्यायला हवा होता. कारण सेना आमसभेच्या आदेशाने ठेवल्या गेल्या होत्या. ऊ थाँटनी सैन्ये मागे घेतली. १५ दिवस सेना तेथे होती. कॅनडाप्रमाणे आम्ही आमचे सैनिक कां हलवले नाहीत? वा युनोला तसे करण्यास भाग कां पाडले नाही? नुकसानभरपाई मागायचीच असली तर युनोकडून मागायला हवी. इस्राइलकडून नव्हे! कारण युद्ध सुरू झाले की माणसे अशी वेगवेगळी टिपून मारता येत नाहीत. गेल्या पाक युद्धात सारी सैनिकीच माणसे मेली, निरपराध माणसे मेलीच नाहीत, अशी ग्वाही आपल्याला तरी देता येईल. काय? अरबांच्या बाबतीतल्या आत्यंतिक पक्षपाती भूमिकेने आमचा सारा विवेकच जरा सुटल्यासारखा झालेला दिसतो. नासेरने राजिनामा दिला. परत घेतला. ह्या विषयावरची पंतप्रधानांची वक्तव्ये अशीच 'उत्साही' (ज्यादा) आहेत 'गाडून टाकू', 'नष्ट करू' ही भाषा बोलणाऱ्या हिटलरला शिव्या आणि नासेरना मात्र पुष्पहार हा न्याय नव्हे! "इस्राइलची निर्मिती हे म्हणे संघर्षाचे कारण (छगला) मग इराक, सिरिया, जॉर्डन ह्यांची निर्मितीही इस्राइलबरोबरच झाली आहे. त्यांचे काय? पाकची निर्मिती हे तर गेल्या २० वर्षात सतत संघर्षाचे कारण राहिले आहे. बोला छगलाजी, पाकचे काय करू या? पण ही भाषा मानवणार नाही. आम्ही किती एकाकी आहोत (पोरके व पोरकटही आहोत!) हे ह्या युद्धप्रकरणी सिद्ध झाले आहे. अजूनही आग विझली नाही. पक्षपाती भूमिका घेण्याऐवजी 'जगा आणि जगू द्या' ही आमची खरी भूमिका! ती ठासून मांडा आणि अकाबा-सुवेझ बंदी उठवा म्हणून नासेरच्या दारात धरणे धरा (आपल्याही पोटाचा प्रश्न आहेच तो) राष्ट्रे शक्ति साधनेने उभी राहतात. पंडितीगप्पा मारून व निषेध खलिते धाडून नाही. (सध्या चिनी खलिते चालू ) हे इस्राइलपासून आम्ही शिकू तो सुदिन! एरव्ही सैनिक वा राजदूतांची विटंबना संपणार नाही!!



## संमेलन गाजले

भोपाळ येथे डॉ. वि. भि. कोलते यांच्या अध्यक्षतेखाली मे महिन्यात पार पडले. ही संमेलने नेहमीच 'गाजतात' व यशस्वीपणे पार पडतात (वृत्तपत्रीय अभिप्राय) वास्तविक हे संमेलन अमराठी भागात भरले. आणि मर्यादित अनुभव व अपुरे मार्गदर्शन ह्यामुळे ते काहीसे गलथानपणे पार पडले अशीच टीका सर्वत्र ऐकू येते. (गैर)व्यवस्थेबद्दलही लकारी ऐकू येतात. (अपवाद राहण्याची सोय) पण साहित्यसंमेलन विषयक विचारात ह्या गोष्टीला काही फारसे महत्व आहे असे मला वाटत नाही ते मी गौण मानीत नाही. पण त्यावरच संमेलनाचे यशापयश मानले जाणे उचित नव्हे. संमेलनाला जाणारी माणसे नेमकी कशासाठी जातात? श्रीखंडपुरीच्या जेवणासाठी? स्पेशल चहासाठी? की छपरी पलंगावर पहुडण्यासाठी? साहित्य संमेलनात खरे महत्व दिले जावे साहित्यविषयक प्रश्नांना! चर्चा व्हावी त्यातल्या यशापयशाची! 'गैरव्यवस्था' ही एक 'प्रकृति' आहे. ती भोपाळलाच आहे आणि पुण्यामुंबईत नाही असे म्हणणे योग्य नव्हे. हा वाद नको!!

साहित्य संमेलनाचे अध्यक्ष डॉ. वि. भि. कोलते हे एक व्युत्पन्न पंडीत! त्यांचे भाषण गाजले ते एका वेगळयाच अर्थाने! ते भाषा पंडित असल्याने त्यानी जनसामान्यांची परिभाषा ही साहित्यात मान्यता पावली पाहिजे, हा विचार मांडला. पुणे, मुंबई, नागपूरची भाषा म्हणजेच मराठी हा आग्रह बरोबर नाही. मराठी मनाचे दर्शन घेण्यासाठी इतरही ठिकाणी लिहिली-बोलली जाणारी भाषा (वा बोली) विचारात घेतली गेली पाहिजे असे सांगितले. पण आज ही प्रक्रिया चालूच आहे. ज्ञानेश्वरांच्या काळापासून मराठीचा हा संसार वाढतोच आहे. ते ते सारे सामावून मराठीचा हा रथ पुढे जातो आहे. नवे नवे शब्द पाडले जात आहेत. (Coined) नवे संकेत रूढ होत आहेत. हिंदी, उर्दू, संस्कृत, इंग्रजी ह्या भाषातूनही मराठीची शब्द संपत्ति वाढत आहे. भाषेची "गंगा बहती है" तो सजीव प्रवाह आहे. ह्या प्रवाहाची 'शुद्ध' करून






# मूर्तिमंत शिल्प हरपले.... पद्मश्री करमरकर

शिल्पकार करमरकर यांचे नांव माहित नाही असा एकही रसिक गेल्या तीन पिढ्यात आढळणार नाही.

विसाव्या शतकाच्या प्रारंभी परदेशात जाऊन प्रगत शिल्पकलेचे शिक्षण पुष्कळजणानी घेतले. परंतु त्या शिक्षणाचा विकास स्वतंत्र प्रज्ञेने करून 'करमरकर टच' निर्माण करणारे एकमेव शिल्पी कोण ठरले असतील तर ते पद्मश्री करमरकर.

पद्मश्री विनायक पांडुरंग उर्फ नानासाहेब करमरकर यांचा जन्म कुलाबा जिल्ह्यात सासवने या गावी २–१०–१८९१ रोजी झाला. मुंबईच्या जे. जे. स्कूल ऑफ आर्टमधे कलेचे शिक्षण त्यानी घेतले. पुढे ते लंडनला गेले व तेथील रॉयल अॅकडमीमध्ये त्यानी तीन वर्षे काढली. तसेच शिल्पकृतींचा अभ्यास करण्यासाठी इटाली, फ्रान्स व हंगेरी या देशांचा प्रवासही करमरकर यानी केला होता. अगदी अलिकडच्या काळात १९४९ मध्ये त्यानी अमेरिकेलाही भेट दिली होती.

'मूर्तिमंत शिल्प' म्हणजे करमरकर अशीच त्यांची ख्याती होती. पुणे येथील शिवाजी मिलटरी स्कूलमध्ये उभारण्यात आलेला छत्रपति श्रीशिवाजी महाराज यांचा पुतळा घडविला होता करमरकर यानीच. शिवरायाच्या कर्तृत्वाची साक्ष जणु त्या पुतळ्याने मिळते. मुंबईच्या चौपाटीवरील विठ्ठलभाई पटेल यांचा पुतळाहि करमरकर यांचीच शिल्पकृती होय. तसेच जमशेटपूर येथे त्यानी जमशेटजी टाटा यांचा जो पुतळा उभारला तोही अलौकिक ठरला. त्यांच्या सुंदर, सजीव शिल्पाचे नमुने भारतातील बहुतेक सर्व प्रमुख शहरी आढळतात.

शिल्पकार करमरकर हे ललितकला अकादमीच्या जनरल कौन्सिलचे सदस्य होते. तसेच दिल्लीच्या नॅशनल अकादमी ऑफ आर्ट या संस्थेचेही ते सदस्य होते. तर बाँबे आर्ट सोसायटीने त्याना उपाध्यक्षपद देऊन स्वतःचाच गौरव करून घेतला होता. इतकेच काय पण प्रसिद्धीच्या झगमगाटापासून दूर राहून शिल्पकलेत तल्लीन असलेल्या या थोर कलावंताची कला इतकी प्रभावी ठरली की भारत सरकारनेही १९६४ मध्ये त्याना 'पद्मश्री'चा बहुमान अर्पण केला.

बहुतेक कलावंत परंपरा आणि प्रस्थापित मूल्ये यांचेच अधिक जतन करणारे असतात. त्यामुळे प्रगतिशील, क्रांतिकारक असे काही नवीन कला-तरंग उमटू लागले की त्यांना ते विपरीत वाटू लागतात, आणि त्यांचा धिःकार केला नाही, तरी स्वीकारही करण्याची दिलदार वृत्ती अभावानेच आढळते. शिल्पकार करमरकर याही बाबतीत अपवाद ठरले. याचे एक सहज आठवलेले उदाहरण म्हणजे अमृता शेरगील यांच्या चित्रकलेतील नाविन्याचा त्यानी केलेला गौरव.

अमृता शेरगिल या प्रख्यात चित्रकाराच्या चित्राना सुवर्ण-पदक मिळाले, तेव्हाची परिस्थिती आठवते. नव चित्रकलेस कोणीही थारा देण्याला तयार नव्हते. काहीतरी भयंकर, विक्षिप्त कार, असे म्हणत अनेक प्रतिष्ठितानी खद्द परीक्षकांवरच टीकेचा भडीमार केला होता. अशावेळी नवी कल्पना, नवे प्रयोग यांचा सदैव खुल्या मनाने स्वीकार करणारा हा थोर कलावंत उभा राहिला. त्याने अमृता शेरगिल यांचे मुक्तकंठाने कौतुक केले. स्वतःच्या शिल्पकलेतहि त्याने सदैव नवनवीन प्रयोग चालू ठेवले. फणसासारखा खरबरीत असलेल्या मामाना (मामा वरेरकर) तयार करून दाखविण्याची हिंमत झाली त्यालाच एकट्याला. असा हा महान कलावंत चिरनिद्रित झाला.

पद्मश्री करमरकर यानी चेंबूरच्या त्यांच्या बंगल्याभवती केलेली बाग आणि तेथील स्टुडियो हे कलावंतांसाठी नेहमीच एक जबरदस्त आकर्षण होते. महाराष्ट्राच्याच काय पण दिवंगत कीर्तीच्या कलावंताला दीपावलीची श्रद्धांजली. —संपादक

घेण्याची प्रक्रियाही चालून आहे. (कोलत्यांनी चिंता करू नये)

मराठीचा अभिमान म्हणजे संस्कृत-विषयी उपेक्षावृत्ति नव्हे! संस्कृतातून मराठीचा जन्म झाला. (अनेक भाषांचा तसा तो झाला. तामिळी मंडळीना सुद्धा संस्कृतचा राग नाही. कोलत्यांना एवढा कशासाठी?) संस्कृतपासून मराठीला मुक्त करायचे म्हणजे नेमके काय? हे रक्ताचे नाते–जन्य–जनक नाते आहे. माझ्या मते साहित्याने कुठल्याच भाषेची बंधनेही मानू नयेत आणि 'मुक्ति'चीही घोषणा करू नये. शब्द हे माध्यम आहे. शब्दागारात जेवढी आयुधे जमतील तेवढी जमवावीत. हे नको, ते नको म्हणू नये. खरी 'श्रीमंती' येते ती यामुळे! 'जनसामान्य' हे निर्मितीचे गमक नाही. मराठीत वेदविद्या आणणाऱ्या ज्ञानेशांची ज्ञानेश्वरी त्या काळच्या कितीशा जनसामान्याना कळली? पचली? मोठमोठ्या तज्ज्ञांनाही आज ती समजायला 'कष्ट' पडतात. जनसामान्यांची उंची वाढविणे. सुसंस्कार व सुशिक्षण देणे हा त्याला मार्ग! मर्ढेकर समजायला मला उंची वाढविली पाहिजे. मर्ढेकरांनी जनसामान्यांच्या परिभाषेत लिहिण्याची खटपट करणे हा त्याला मार्ग नाही. आज जनसामान्य (इति कोलते) म्हटल्या जाणाऱ्या वर्गातून जे साहित्य निर्माण होते आहे त्याची परिभाषा कुणीही नाकारली-धिःकारली नाही. मराठीची गंगा पुढे पुढे वाहतेच आहे. त्या वर्गाची जी प्रगति होत आहे त्यातूनच हा प्रवाहही मोठा होत जाईल. त्यासाठी संस्कृतचे रक्ताचे नाते (व्याकरण दृष्टचाही) तोडून टाकण्याची गरज नाही. ज्याचे जे जे चांगले ते ते घ्या—मग संस्कृतचे कां नको?

अनुभवक्षेत्राचा विस्तार झाला म्हणजे साहित्यात व्यापकता येतेच असे नाही. लेखकाने भटकायला हवे हे खरे. पण नुसते भटकणे उपयोगी नाही. व्यापक अनुभव घेण्याची, पेलण्या, पचविण्याची

क्षमता वृत्तीची संवेदनक्षमता, तरलता, कल्पकता इत्यादि अनेक गोष्टींवर साहित्य निर्मितीची व्यापकता अवलंबून आहे. अखेर, ज्याची त्याची माती ज्याचे त्याचे साहित्य घडवीत असते ( लडाखवरील पु. ल. दे., भावे, वसंत कानेटकर, सवनीस यांचे लेख वाचावेत ) नुसता व्यापक भूभाग पाहणे इथे उपयुक्त ठरत नाही. त्या 'सामाजिकतेला' पुन्हा 'वैयक्तिकते'ची मर्यादा पडत असते. कोलत्यांच्या 'समाज निष्टेने'च्या विचारानेही असेच कोडयात टाकले आहे. 'जीवनातली घाण काढणे' हे साहित्याचे कार्य आहे. कारणमीमांसा केली पाहिजे, असें ते सुचवितात. जनसामान्यांचे कोलत्यांना अधिक आकर्षण आहे. ( तक्रार नाही ) जनसामान्यांचे शब्द रूढ व लोकमान्य करण्यासाठी व त्यांना प्रतिष्ठा देण्यासाठी शिष्ट साहित्यिकांनी ( चांगल्या अर्थाने ) त्यांच्या पाठीशी उभे रहावे असे ते सुचवितात. ( ह्रा सारा प्रकार किती कृत्रिम आहे हे ध्यानात यावे. शहरी लेखक ग्रामीण भाषा लिहितात तेव्हा कसा प्रकार होतो (?) व्याकरणाची मोडतोड ही अखेर भाषेची संपूर्ण मोडतोड करून जाईल हे काय कोलत्यांना ठाऊक नाही? गल्लीगणिक नवे व्याकरण रूढ होईल. आणि 'भाषिक' मारामाऱ्या वाढतील. मीच "शुद्ध" कसा हे पटवून देण्यात शक्ति ( व शब्द ) खर्च होतील. ह्या बाबतीत कोलत्यांइतकी संस्कृतविरोधी व आत्यंतिक भूमिका घेणे परवडणार नाही. भाषा संस्कार, ज्ञानकक्षा विस्तृत झाल्या की विकसित होत जात असते असे आम्ही मानतो. त्यासाठी पकड संस्कृतचा शब्द आणि घाल कुऱ्हाड अशी भूमिका घेणे नको.

साहित्यसंमेलनात एक गोष्ट अजून होत नाही. जसे औपचारिक संमेलन भरते तसेच संमेलनाला आलेल्या सर्व मराठी लेखक-कवींचे अनौपचारिक संमेलन ! मंडळी येतात. पुणे, मुंबई, कोल्हापूर असे गट करून फिरतात. गप्पा मारतात. चहापाणी ( वगैरे ) होते. पण साहित्यिक संवाद, परिचय होत नाही. हे होणे अत्यंत अगत्याचे आहे. त्यातून साहित्यिक कुटुंब-संस्था वाढीला लागेल. ती लागणे विनिमय-विकासाचे दृष्टीने आवश्यक आहे असे वाटते.

## स्तुत्य ! अभिनंदनीय ! !

गेल्या महिन्यातली एक चांगली बातमी ! आशादायक ! कलेतले निरोगित्व सुचविणारी! मुंबई मराठी साहित्य-संघात तामिळी साहित्यिकांचा सत्कार करण्यात आला. आज सर्वत्र विघटनकारी शक्ति कार्यरत झालेल्या असताना कलेच्या क्षेत्रातली ही निर्मळ भावना मनाला आल्हाद देऊन जाते. आपण ह्या माध्यमातून जितके जवळ येऊ तितके आपापसातील समज-गैरसमज कमी होत जातील. भाषेच्या अडचणी दूर होत जातील. मनांच्या माध्यमातून सामंजस्य येईल. कला सर्व भेदातीत असते हे पुन्हा एकदा सिद्ध होईल. मला स्वतःला ही नुसती 'वार्ता' वाटत नाही. एक नवा 'प्रसाद' वाटला. ह्या साऱ्या भाषांतल्या उत्तमोत्तम कलाकृतींनी अखेर आमच्या देशाची मान उन्नत ठेवली आहे. शान वाढविली आहे. कलेच्या साधकांचे (मराठी-तामिळी ) ह्या निमित्ताने आम्ही अभिनंदन करतो. उपक्रम स्तुत्य! तेथेच तो थांबू नये ही इच्छा! !

## साप्ताहिक 'सोबत'

दैनिकांच्या "साप्ताहिक" आवृत्त्या निघायला लागल्या आणि साप्ताहिकांचे संसार उध्वस्त झाले आहेत. 'विविधवृत्त' बंद पडले. 'आलमगीर' तग धरून असले तरी ते 'गाजन' आहेसे दिसत नाही. 'विवेक' धनुर्धारी ही साप्ताहिके चालू आहेत. पण त्या मुखपत्रांना काही एक विशिष्ट वाचक लाभलेला आहे. त्यांचे स्वरुपही आता ठरून गेल्यासारखे झालेले आहे. अशा परिस्थितीत नवीन साप्ताहिक काढण्याची, ते लोकप्रिय करण्याची कल्पना मुळातच धाडशी म्हटली पाहिजे. पैंजण, बुवा, अद्भूत ह्या मासिकांचे संपादक श्री. ग. वा. बेहेरे ह्यांनी आपल्या चवथ्या मासिकाचे–'**सोबत**'चे रुपांतर साप्ताहिकात करायचे योजिले तेव्हा अनेक प्रश्नचिन्हे डोळ्यासमोर होती. बेहेरे यांची लेखणी जेवढी 'ललित' आहे तेवढी ती 'घणाघाती' आहे, कडक आहे याचा प्रत्यय पैंजणमधल्या नांवी-निनावी लेखांनी आधीच दिलेला होता. आजच्या भाट-चारणगिरीच्या राजकीय वातावरणात निडरपणे आपली मनोमन पटलेली मते मांडणे ही गोष्ट वाटते तितकी सोपी नाही. बेहेरे यांच्या लेखणीने हे कार्य केले आहे. साप्ताहिक '**सोबत**'चे आतापर्यंत चार अंक पाहण्यात आले. ते पाहिल्यानंतर 'सोबत'बद्दलच्या अपेक्षा उंचावल्या आहेत. लता, शिवसेना, शिवाजी, लेखक–प्रकाशन धंदा इत्यादि विषयांवरचे बेहेरे यांचे लेखन हे विचारार्ह आहे. भाषेत जोष आहे, चैतन्य आहे, तर्कसुसंगति आहे. त्या साप्ताहिकातली काही सदरे ( पंचम, कटाक्ष, अक्षता, सहज सुचलं म्हणून, आठवड्याचा महापुरुष इ. ) आवडली. बुवांची 'हजेरी' अजून 'जमली' नसली तरी लवकरच जमेलसे वाटते! फडणीसांची व्यंगचित्रे हे भूषणच! साप्ताहिकाला स्वतःचे व्यक्तित्व देण्यात बेहेरे व त्यांचे सहाय्यक यशस्वी होत आहेत. कथा, भविष्य वगैरे माल असतोच. टीम चांगली आहे. 'सोबत'-कार ह्या नव्या उपक्रमात यशस्वी होवोत. किंमत पंचवीस पैसे आहे हा दिलाशाचा भाग. एक कडवे राष्ट्रवादी साप्ताहिक म्हणून "सोबत"चे स्वागत!

**–सारस्वत**








(अग्रलेख-- पान ४ वरून)

बन्सी, खांडवा, पोटचा, गहू, टपोरी मोती भासणारी ज्वारी वगैरे एकेक नांव घ्यायचे नि मिलो, तांबडा गहू, उकडे तांदूळ यांचे आंबोण खायचे. बाकी माणसे वेडीच खरी. कॅटल-फीड कां खात नाहीत असा प्रश्न समस्त दुधाळू जनावरे विचारतात!

कपडा ना? सालेमच्या लुंग्या, नंजावरी साड्या, कोईमतुरी खण, ब्लीडिंग मद्रासचे शर्टस यांचा हा ढीग पडला आहे की? त्यापैकी जे विकत घेण्याची ऐपत नसेल, त्यासाठी कर्ज काढा. जे लवकर फाटत असेल ते पुन्हा विकत घ्या. म्हणजे बँका आणि मद्रासी दोघेही तरले. तुम्ही कसचे बुडता हो! तुमच्या नाकातोंडात पाणी गेले, तर बाहेर काढून शुद्धीवर आणून पुन्हा ढकलावयाला सावकार, स्वाहाकारी बँका नि सहकारी तसेच खादी भांडारे आहेतच की.

राज्य सरकारांचे काय? बडे भाई सो बडे भाई, छोटे भाई सुभान अल्ला! सत्ता वंशपरंपरेने चालली पायजेल हेत पाट नि बंधारे फुटायला पायजेलाहेत अल्पबचत इष्टांक कागदावर पूर्ण व्हायला पायजेलाय. उखळ (आपलेच हो) पांढरेच रायला पायजेलाय. पण दिल्ली पैसा नाय म्हणते... मग गल्ली हायेच की... "घरकी मुर्गी दाल बराबर".

अशा या बहुरंगी, बहुढंगी, बहुगुणी घेरावचे जाळे जंतेवर असे मस्त फेकले गेले आहे की बांसरी तो बजे, बाँस भी फुटे लेकिन उस्के दो टुकडे न हो पाये! (आपली राष्ट्रभाषा म्हणून वापरली हो) कारण तुकडे झाले तर ते चुलखंडात तरी घालता येतात.

'मरण्यातच परी जग जगते' ही कविवर्य तांब्यांची उक्ती अधिकाधिक चांगल्या प्रकारे वठवून पुनाचा, मोरारजी व त्यांचे राज्याराज्यातील डावे उजवे व आधार देणाऱ्या मेढींसारखे हस्तक यानी मराठी शारदेच्या दरबारात उत्तम सेवा बजावली आहे, यात काय संशय? जय समाजवाद.. जय (पर) लोक शाही.

—संपादक

(पृष्ठ ५ वरून)

तयार होतो, तेव्हा तीच साधना केल्यास संगीताचे मर्म आपोआप कळते, असे प्रत्युत्तर माझ्या मुद्याना देण्यात येते. तसेच हाडातही काहीतरी संगीत असावे लागते हेहि खरे. हाडातच संगीताची गोडी ही निसर्गदत्त बाब. घराण्यातील रसिकता, शाळा कॉलेजातील संगीत, मित्रपरिवारांचे संगीत प्रेम इत्यादि घटकांतूनहि संगीताची गोडी लागते. तशातच मोठ्या शहरी धावपळीचे जीवन जगणाऱ्या अतिसामान्य (लोअर मिड्ल क्लास) लोकाना तितका वेळहि नसतो आणि दिवसभराच्या दगदगीनंतर गाण्याची लज्जत लुटण्याचा मूडहि नसतो. एकूण सामान्य माणूस तसा अनभिज्ञच राहतो.

संगीत-महोत्सवाचे सीजन-तिकीट काढले तरी सर्वच कार्यक्रम ऐकणे प्रत्येकाला अशक्यच असते. तेव्हा रसिक श्रोता कसा तयार होईल हाही तितकाच महत्वाचा मुद्दा संगीताच्या सर्वांगीण विकासाचे दृष्टीने आवश्यक आहे.

तथापि तेवढ्यानेच भागत नाही. म्हणून संगीत-बैठकीचे वेळी गायक-वादक यांच्या प्रत्येक कार्यक्रमाचे प्रारंभी राग, व त्या रागाची थोडीशी ओळख (दहा-पंधरा वाक्ये) करून दिली जावी. तसेच कार्यक्रमाचे वेळी तो मजकूर असलेल्या पत्रिका मुद्दाम वाटाव्यात. बैठकीसाठी होणाऱ्या एकंदर खर्चाचे मानाने तो खर्च (वेळ आणि पैसा) फारसा पडणार नाही. उलट ती सोय झाल्यास अनभिज्ञ माणसाला संगीतात लक्ष घालावेसे वाटेल. अनेक कार्यक्रमाना जावेसे वाटेल. कलेच्या तुलनात्मक विचाराची आवड निर्माण होईल आणि त्यातून दर्दी रसिक सहजपणे तयार होतील.

मुंबई ५८ —प. स. दातार

(पृष्ठ ५३ वरून—विमान)

एकवेळ तुफानी वादळी ढग परवडतात. पण गारांचा मारा छातीत धडकीच भरवितो. कारण–गारांची निर्मिती तसल्याच ढगांतून होत असते. एकाएकी अति-शीत वाऱ्याचे झोत वाहू लागले की ढगातील पाणी गोठून वारा बनतात. आणि अक्षरशः मशिनगनच्या गोळ्यांसारखा त्यांचा तो जबरदस्त मारा विमानाचे पंख आणि सांगाडा पिंजून काढतो. त्याचप्रमाणे अति-शीत वाऱ्यांमुळे विशेषतः उत्तर आणि दक्षिण ध्रुवांजवळील देश तसेच हिमालय व आल्प्स पर्वतराजींचा प्रदेश. येथे ढगांतील पाण्याचे रुपांतर हिमकणात होते आणि त्यांचाही मारा वैमानिकाचे दृष्टीने फार घातक ठरतो. या साऱ्या प्रकारांतून विमान सुखरुपणे चालविणे हे प्रकाशाच्या (व्हिजन) अभावी अशक्य होते. तेव्हा डोळ्यांचा उपयोग फक्त यंत्रांकडे पहाण्यासाठी करून यंत्रांच्याच साह्याने विमान चालविणे, उतरविणे व उड्डाण करणे हे वैमानिकांच्या रोमारोमात भिनवावे लागते.

हे झाले अंतराळातील हाल. विमानतळावर उतरण्यासाठी विमान उंचीवरून खाली येते, तेव्हाही पावसाळ्यात फार दक्षता घ्यावी लागते. ढगात लपलेल्या पर्वतांच्या शिखरांवर विमाने आपटून फुटल्याचे अपघात तर दरवर्षी होतात. नेफासारख्या प्रदेशातील मुसळधार पाऊस हीही एक मोठी आपत्ती असते. अशा प्रसंगी एकतर विमान अन्यत्र पाठविलेही जाते. तशा बातम्या आपण वाचतो. किंवा यंत्रांच्याच साह्याने ते उतरविणे वा उड्डाण करणे भाग पडते.

सारांश, लहानपणी 'गरगर फिरे विमान, बघ हे गरगर फिरे विमान' अशी एक कविता आपल्यापैकी पुष्कळानी पाठ केली असेल. ती कविताही सुमारे पंचवीस एक वर्षांपूर्वी मराठी शाळेच्या पुस्तकात असल्याचे माझ्या एका मराठी मित्राने मला सांगितले होते. त्यात वर्णन केलेली दशा पावसाळ्यात वैमानिकाला भोगावी लागते. तसे होऊ नये म्हणून ढगांचे रंग-रूप आकार-प्रकार, गुणावगुण हेही आमच्या मस्तकात कोरले जातात. हवामानाचा अंदाज पडताळून पहाण्याचे शिक्षण दिले जाते. हजार दीडहजार तासांच्या उड्डाणांचा अनुभव असतो. तरीही वादळी ढगांचे थर...' उंचीवर आहेत. तेथे वाऱ्याचा वेग आणि दिशा...आहे असा हवामानाचा अंदाज वाचल्यानंतर वैमानिकाच्या तोंडून त्या वाईट हवेचा उद्धार होतो हेही स्वाभाविकच नव्हे काय? •••






REGD. NO. MH-450 Licence No. 170 to post without pre-payment JULY 1967

DIPAVALI MONTHLY



COVER PRINTED AT ASHA PRINTERY, BOMBAY 4.